# विद्यालंकार

( शैक्षणिक, वाङ्मयात्मक, सङ्गीत नाटक )

लेखक

वि. ना. कोठीवाले

1944



॥ मातृदेवो भव ॥

आई,—

पुत्राचे सहस्र अपराध ।
माता काय मानी तयाचा खेद ॥

तुझा,—
नव्यानवसाचा एकुलताएक
बब्या

# विनय

**यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् ।**
**यद्यदात्मवशं तु स्यात्तत्तद्यत्नेन सेवयेत् ॥**
**सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।**
**एत्तद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥**

—मनुः

"Patriotism, as I understand it, is love of your country, love so great that you are prepared to give up your own interests and so sacrifice your lives if necessary for the honour and welfare of your country."

—King George the Fifth.

## प्रास्ताविक

इ. स. १९१७ सालीं लोकमान्य टिळक, हे साताऱ्यास के. तीं. र. पां. करंदीकर (दादा) यांजकडे आले असतां एके दिवशीं पंक्तिवर कुणीसा लोकमान्यांना प्रश्न विचारिला कीं, "अहो, दादा! या चालू इंग्रजी शिक्षणाचा आपल्याला व आपल्या देशाला पुढेंमागें कितपत उपयोग होणार आहे?" लोकमान्यांनीं तात्काळ उत्तर दिलें कीं, "जोंपर्यंत इंग्रज राज्यकर्त्यांना आपल्या राज्ययंत्राला जेवढें your most obedient servant म्हणून सह्या करणारे, युनिव्हर्सिटींच्या हमालखान्यांतून निघतील तेवढेंच आणि तोंपर्यन्तच चालू इंग्रजी शिक्षणाची मातब्बरी राहिल! माझ्या आजच्यादृष्टीनें, फार तर १९२५ सालपर्यन्तचे होणारे सारे पदवीधर, आपापल्या बापजाद्यांच्या गुलामी वशिल्यानें इंग्रजी मुलकी खात्यांत २५।३० रुपड्यावारी दैवाची विक्री करीत राबतील; परंतु हीहि सोय ज्या हिंदी तरुणांना नसेल, त्यांना मात्र "अन्नान्न" करीत फुकट मरावें लागेल! आणि त्यांतच राष्ट्राचा शक्तिक्षय होणार असून, एकंदर हिंदी संस्कृतीचा बोजवारा उडेल!" लोकमान्यांच्या तोंडून हीं वाक्यें

जेव्हां बाहेर पडलीं तेव्हां, सारी पंगतच स्तब्ध-गांभिर्यांत गप्प राहिली! मी त्यावेळीं पंक्तींतून पाणी वाढित होतों! कोणीच तें घेईना; इतका त्यावेळीं दादांच्या स्पष्ट बोलण्याचा जेवणावर परिणाम झाला व सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें! माझ्या बाल मनावर तर त्यावेळीं भीतीचाच ठसा उमटला; कारण, नुकतांच मी सातारा हायस्कूल मध्यें इंग्रजी पहिल्या इयत्तेंत प्रवेश केला होता! अर्थात् त्यानंतरच्या सात वर्षांत, माझी शैक्षणिक दृष्टी, ही जवळ जवळ विचिकित्सकच बनत गेली. आणि विद्यापीठाच्या प्रवेश परिक्षेच्या पहिल्याच पायरीवर मी दुर्दैवानें तोंडघशी पडल्यामुळें तर, याबाबत जास्तच माझी बुद्धि प्रखर होत चालली! विद्यार्जनाच्या काळांत तरुण मनाला, शाळा-कॉलेजांतील खिडकी-बाहेरचें व्यवहारी जग दिसत नाहीं! पण मी तें चालू शिक्षण-पद्धतींतल्या ठराविक अभ्यास-क्रमांत व नेमलेल्या पाठ्य-पुस्तकांत पाहूं लागलों! मला तें कांहींसें शाळेंतल्या वाचनालयांत दिसलें. आणि त्यांतूनच विविध विद्यालंकार घडविण्याचें मी ठरविलें! प्रस्तुत प्रयत्न, हा त्याचाच परिपाक होय!

## शिक्षण-मंत्री!

स्वतंत्र देशांतील शिक्षण मंत्री, हा बाल-बालिकांच्या मनःक्षितिजावरील ज्ञान-विकास करणारा सूर्य असेल; पण तो परतंत्र देशांतील ज्ञान-खलास करणारा काजवाच ठरत असतो! स्वातंत्र्येच्छु तरुणांच्या आकांक्षांना, योग्य दिशा दाखविणारा तो ज्ञानवृद्ध वाटाड्या असेल; पण परतंत्र राष्ट्रांतील स्वातंत्र्य-लोलुप तरुणांची हटकून दिशाभूल करणारा शिक्षणमंत्री मात्र, सोंगाड्याच बनत असतो! तरुण-पिढीच्या मनांत, आपल्या राष्ट्रीय गरजा, स्वतंत्र शिक्षणमंत्री बिंबवून त्यांच्या साऱ्या कर्तृत्वशक्तीचा ओघ वळविणारा तो तिकडे अनुभविक पुढारी असेल; तर इकडे त्या सर्वांना बंधनांत ठेवून, तरुण-पिढीचा कोंडमारा करणारा तो एक पेंढारी आहे! स्वतंत्र ज्ञान-प्रसारासाठीं, तिकडे तो धनाढ्यांचा पैसा ओढून घेणारा जर लोहचुंबक मानला, तर इकडे तो विद्यार्जनाच्या नांवाखालीं गोरगुरिबांनाहि बुचाडणारा एक विद्या-वंचक शंखच समजला पाहिजे! राष्ट्रीय गरीब विद्यार्थ्यांचें पालन-पोषण करून, त्यांना मनसोक्त ज्ञान-दान देणारा तो तिकडे गुरु-जनक म्हणून गणला जातो; इकडे तो याबाबत विदूषकी थाटांत, भिक्षुक बनत राहतो! स्वतंत्र राष्ट्राच्या माथीं, प्रजा-क्षयाचें

पाप बसूं नये म्हणून, तिकडचा शिक्षण मंत्री, आपल्या तरुण-विद्यार्थी बळाचा शारीरिक नि मानसिक ऱ्हास होऊं देत नाहीं! इकडचा कसा नि कां तो होत आहे, याचा विधिनिषेधहि मानीत नाहीं! थोडक्यांत, स्वतंत्र विद्यार्थ्यांना सर्व तऱ्हेची मदत करणारा तो तिकडे त्यांचा जिवलग मित्र; तर इकडे मात्र परतंत्र विद्यार्थ्यांची मुस्कटदाबी करून, त्यांची गळचेपी करणारा प्राणघातकी मित्र!

## आजचा आपला शिक्षण-मंत्री!

उदारमतवादी मॉंटेग्यू साहेबांनीं आपल्यालाहि शिक्षणमंत्री दिलेला आहे; पण तो ज्या असनावार विराजमान झाला आहे, त्याखालीं साम्राज्य-धोरणाच्या उग्र विचारांचा दर्प ठेविला आहे! त्यामुळें आमचा शिक्षण मंत्री लोकप्रतिनिधि जरी असला, तरी तो गव्हर्नरनें नेमून दिलेला असला पाहिजे! तो जनतेपासून बव्हंशीं दूरच; पण प्रान्ताधिकाऱ्यांच्या जवळच असला पाहिजे! त्याचें स्वातंत्र्य कबूतरी असून, त्याला बहिरी ससाण्याची पकड जरी दृढनिश्चयानें घेतां आली, तरी पण प्रांताधिकाऱ्यांच्या हातांतील त्याचें बंद, त्याला स्वैरसंचार करूं देत नाहींत! सर्कसच्या रिंगणांत फिर, मात्र चाबकाकडे नजर ठेव! कारण, साम्राज्य-कल्याणतत्पर गव्हर्नर व दुसरा मालकाच्या ताब्यांत हिताहित नसलेला इंग्रजी सनदी नोकर—डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन्स—यांनीं सरंक्षण केलेल्या चिंचोळ्या मार्गावरूनच त्याला लोकहित साधण्याची करामत, करून दाखविण्याची असते! म्हणजे शिक्षण-विषयक कायदेकानूंच्या कांटेरी कुंपणानें त्याची चांगली नाकेबंदी केल्यानंतरच शिक्षण मंत्र्याला आंत मोकळे सोडलेलें आहे! सरकारच्या राखीव खात्यांत, त्यानें ढवळाढवळ तर अखत्यारीनें करायची नाहींच; पण प्रजेकडून युक्ति प्रयुक्तीनें शिक्षण सुधारणेसाठीं पैसा जमविण्याची जबाबदारी मात्र, योजनापूर्वक त्याच्या शिरावर लादली आहेच! राखीव व सोपीव शब्दांत ब्रह्मांड आहे!

अशास्थितींत, आर्य परंपरेला अनुसरून शिक्षण—मंत्र्याला सन्मान्य कुलपतींचें पद लाभावें, आचार्यांचाहि तो गुरु व्हावा, स्वतःचे उज्ज्वल चारित्र्य व विद्वत्व यामुळें आजच्या कर्तव्यशून्य जनतेंत प्राचीन ऋषित्वाची त्यानें आठवण करून द्यावी इ. आशा करणें म्हणजे कल्पनाशक्तीचा दुरुपयोग करणें

होय ! एवंच, शिक्षण-संस्थाच्या सभोंवतीं एक भुल-भुलावणीचा चक्रव्यूह उभारला गेला आहे ! कारण, इंग्रजांच्या राजकीय (Political) खात्याकडे किलकिल्यादृष्टीनेंहि पाहण्याची त्याची प्राज्ञा नाहीं ! मग विद्यार्थ्यांकरवीं देशाच्या स्वातंत्र्यघोषांत भाग घेणें आणि राष्ट्र-स्वातंत्र्याच्या रणयज्ञांत स्वतःची आहुति देणें, वगैरे सर्व फोल आहे ! तो कठोर परिस्थितीनें बद्ध असून, शिक्षणखात्यांतील धोरण बदलण्याचें सामर्थ्य त्याच्या अवतारांत आज तरी दिसत नाहीं ! सबब, शिक्षण-मंत्री म्हणजे सरकारचाच एक पगारी मनुष्य ! त्याला लोकांचा पाठिंबा नाहीं ! असहकारितावाद्यांना तर त्याची पर्वाच नाहीं ! आणि राष्ट्रीय पक्षाला त्याच्याशीं एकजीव होण्याची इच्छाहि नाहीं ! तो कायद्यांत आहे, व्यवहारांत नाहीं !

## इंग्रज राज्यकर्त्यांचा शैक्षणिक दृष्टी-कोन !

" ज्या इंग्लंडाभिमानी गव्हर्नर जनरलांनीं, इंग्रजांचें प्रभुत्व, न्यायान्यायाची पर्वा न करितां, बंगाल प्रांतांत प्रस्थापित केलें व इतर प्रांतांतहीं इंग्रजांचा पाय कायमचा कसा रोंविला जाईल, ह्याची अहर्निश चिंता वाहिली, त्यांनीं काय संस्कृत व अरेबिक ह्या भाषामध्यें हिंदु-मुसलमान विद्यार्थ्यांनीं प्रवीण होऊन आपली परिस्थिति समजून घ्यावी, अशा उदार हेतूनें अठराव्या शतकाच्या अखेरीस कॉलेजें काढिलीं असतील ? नाहीं बरें ! तर इ. स. १७९१ सालीं लॉर्ड कॉर्नवालिसच्या संमतीनें बनारस कॉलेज स्थापन करतांना, तेथील रेसिडेंट जोनाथन डंकन साहेब यांनीं अनेक अंतःस्थ फायदे सांगतांना खालील उद्गार काढले तें वाचनीय आहेत :—

"Two important advantages seem derivable from such an establishment: The first to the British name and nation, in its tendency towards endearing our government to the native Hindus by our exceeding in our attention towards them and their system the care even shown by their own native princes...."

इ. स. १९ व्या शतकाच्या आरंभी ज्या इंग्रजी शाळा कॅरे, वॉर्ड, मार्शमन किंवा अलेक्झॅन्डर डफ् या पाद्र्या मिशनऱ्यांनीं कलकत्ता व सेरामपूर येथें

स्थापन केल्या, त्या काय आमच्या हृदयांतील श्रीकृष्ण, राम, बुद्ध आणि महंमद ह्यांच्या पुसट प्रतिमांना उजळा देण्याकरितां केल्या होत्या? पहिल्या पहिल्यांदा मिशनऱ्यांनीं आम्हांस बाटविण्याच्याच दुष्ट हेतूनें आमच्या शिक्षणाबद्दल आस्था कशी दाखविली, हें नरेन्द्रनाथ लॉ ह्यांनीं आपल्या Promotion of learning in India by Early Settlers upto about: (1800 A. D.) या पुस्तकांत चांगलेंच निदर्शनास आणिलें आहे :—

"It should be borne in mind that the first efforts of the East India Company to defuse education were prompted by a religious motive, viz; the evangelization of Indians......"

It was the chaplains and missionaries who were the most zealous in educational work."

ज्या ईस्ट इंडिया कंपनीनें आमचा व्यापार बुडवून, इंग्रजांच्या राज्याचा विस्तार केला, त्या कंपनीनें दहा हजार रुपयांपासून दहा लक्ष रुपयांपर्यंतच्या रकमा १९ व्या शतकाच्या प्रथम भागांत शिक्षणावर खर्च केल्या, त्या काय आम्हांस स्वतःच्या पायांवर उभें करावें व आम्हांस खरें ज्ञान द्यावें, अशाकरितां मंजूर केल्या असतील? सुप्रसिद्ध लॉर्ड मेकॉले यांच्या सल्ल्यानें लॉर्ड वुइल्यम बेंटिंग यांनीं जें सरकारी फर्मान काढले व आमची जुनी परंपरा नष्ट करून तिच्या जागीं नवीन परंपरा सुरू केली, त्यांत काय परोपकाराचा हेतू होतां? उलट, लॉर्ड बेंटिंग ह्यास हिंदुस्थानांतील शिक्षण-प्रसारापासून किती धोका वाटत होता, हें त्याच्या मागून आलेल्या मेट्कॉफ साहेबांनीं सन १८३५ च्या आपल्या मिनिटांत नमूद करून काय ठेवलें आहे, तें पहाः—

"His Lordship (Bentinck) however sees further danger in the spread of knowledge and the operations of the Press. I do not for my own part anticipate danger as a certain consequence from these causes." (Metcalfet)

सुप्रीम कौन्सिलचे सभासद असलेले मेकॉले साहेबांचे सन्मान्य मेहुणे ट्रेव्हेलिअन साहेब, यांनीं तर कांहींहि आडपडदा न ठेवतां १८५३ मध्यें हाउस ऑफ लॉर्डसपुढें झालेल्या साक्षींत, आमची जुनी संस्कृति नष्ट करण्या-

चाच नीच हेतू बोलून दाखविलेला आहे ! आणि ईस्ट इंडिया कंपनीची सनद पुन्हा काढण्याच्या वेळीं हिंदुस्थानच्या कारभारासाठीं नेमलेल्या कमिशनरांचे सेक्रेटरी मि. टी. हाइड् व्हिलिअर्स यांच्या पत्रकांतील सवालांस उत्तर देतांना ऑनरेबल मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन् साहेब तर चक्कच लिहितात:—

"The most important branch of education in my opinion is that, designed to prepare natives for Public employment. It is important, not only from its contributing so directly to the general improvement but also from the stimulus it affords to education among the better class of natives, by connecting it with their interest.

I conceive that the study of English ought to be encouraged by all means and that few things will be so effectual in enlightening the natives, and bringing them nearer to us. The result of Educating natives both in English and in their own language must be favourable to the Progress of Christianity." —Elphinstone.

मद्रासेंतील मिशनरी, मुंबईचे एल्फिन्स्टन व वायव्य प्रांतांतील थॉमसन यांचे शिक्षण विषयक प्रयत्न परकीय राज्य स्थिरस्थावर करण्यासाठींच झाले कीं, आम्हांस अज्ञानांधःकारांतून बाहेर काढण्याकरितां ? इ. स. १८५४ मधील खलित्यांत शिक्षणखात्याची रचना, युनिव्हर्सिटीची स्थापना, सरकारी शाळा व कॉलेजें, ग्रँट-इन्-एड् इत्यादि गोष्टींच्या रूपानें शिक्षण विस्तार करणाऱ्या इंग्लंडच्या धोरणाची येथें प्रतिकृति जरी दिसून आली,-तरी पण ईस्ट-इंडिया कंपनी नष्ट झाल्यानंतर १८५९,मध्यें सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या खलित्यानें तेंच धोरण कायम झाले आणि इ. स. १८८२ तील रिपन साहेबांच्या कारकीर्दीतील कमिशननें जरी त्यास पुष्टि दिली गेली, तरी त्यांत इंग्रजांच्या राजकीय सबसिडियरी सिस्टिमच्या (पैसा लोकांचा पण हुकमत इंग्रजांची) धोरणाशिवाय दुसरे कोणतें धोरण दिसून येतें. ? शेवटीं, ज्या बादशाही कर्झन साहेबांच्या रोमरोमांत साम्राज्याभिमान मुरलेला होतां, त्यांनीं १९०२ मध्यें डायरेक्टर जनरल ऑफ एज्युकेशनची जागा निर्माण केली आणि १९०४ सालीं कमिशन नेमलें, त्यांचा हेतू काय आम्हांस जिवंत ज्ञान देण्याचा होतां ?

तात्पर्य, इंग्रज लोक मोठे स्वातंत्र्यभक्त आहेत असा त्यांचा लौकिक आहे; परंतु हिंदुस्थानांत त्यांचें साम्राज्य आहे. कोणतेंही साम्राज्याभिमानी राष्ट्र आपल्या कह्यांत असलेल्या राष्ट्रांत स्वातंत्र्याचें बीजारोपण करूं शकत नाहीं. आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यास मूर्ख मनुष्यहि तयार होत नाहीं, मग शहाणे व धूर्त असे इंग्रज अशी भलतीच चूक कशी करतील? राजकारण कांहीं दानधर्मविधि नाहीं आणि साम्राज्यरक्षण म्हणजे कांहीं परोपकाराची-शाळा नाहीं! इंग्रजांनीं दिलेल्या शिक्षणाबद्दल, जेव्हां आम्ही गोडवे गातो किंवा उलटपक्षीं, इतकी वर्षे दिलेल्या शिक्षणानेंही आमची राष्ट्रभावना तीव्रतेनें जागृत झाली नाहीं, असा जेव्हां या चालू शिक्षणाविरुद्ध आक्रोश करतो, त्यावेळीं मनुष्यस्वभावाचें हें सामान्य ज्ञानही आपणांस नाहीं, असें आपण दाखवितों!

## प्राथमिक शिक्षण-खात्याचा चुथडा!

शिक्षणसंस्थांतून जितके नालायक, जितके निर्वीर्य, जितके स्वाभिमान शून्य विद्यार्थी बाहेर पडतील तितक्या शिक्षण संस्था अधिक यशस्वी हें इंग्रज अधिकाऱ्यांचें धोरण! शिक्षण संस्था म्हणजे इंग्रजांचें प्रभुत्व ह्या देशावर अबाधित राखितां येईल, अशाकरितां निर्माण केलेलीं बालोद्यानें! तेव्हां, त्या दृष्टीनें स्थानिक स्वराज्य व लोकलबोर्डस् ह्यामधील प्राथमिक शिक्षणाचा विचार केला, तर काय दिसून येईल? सामान्य मास्तर जेवढा शिकलेला असतो, तेवढा त्याचा कारभारी देखील शिक्षित नसतो! अशिक्षित विडीपानपट्टीवाले गणेगंपेच फार! आणि म्हणूनच तर आज प्राथमिक शिक्षक, भिकेच्या पंथाला लागले आहेत! तरुण गतभर्तृक शिक्षिका, आपल्या शीलाकरितां जसी लालच्या जाचांतून हंबरडा फोडीत दाद मागत आहेत! या ठिकाणीं एका अप्रीय गोष्टीचा उल्लेख करणं जरूर आहे कीं, खरोखरीच ज्या अनाथ स्त्रियांना नोकऱ्यांची जरूरी आहे, त्यांना त्या मिळत नाहीं! सुखवस्तु श्रीमंतांच्या मुलींनीं अविवाहित राहाण्याचें वेड सोडून, आपल्या नोकरीची जागा अनाथ स्त्रियेला द्यावी! चालू शिक्षणानें लौकिक जात पात तर राहोंच; पण ईश्वरनिर्मित लिंगभेद ही, अलीकडील स्त्री-पुरुष विसरूं लागले आहेत, हें बरें नव्हे! सुशिक्षित स्त्री, अशिक्षित स्त्रीशीं जेवढी माणसूकी सोडून वागत असते, तेवढीं पुरुषी कारवाईहि तशीच वागत राहते! स्त्रीशिक्षण व आर्थिक स्वातंत्र्य प्रतिपादन

करणारा शिक्षणतज्ज्ञ अजून जन्मालाच यावयाचा आहे ! कदाचित्, चालू तरुण-स्त्री-पुरुषांचें मरण, अजून देवि शारदेला पाह्यचें असेल !

सध्यांच्या शिक्षणखात्यांत सर्व धंद्यांतील गाळ आलेला आहे ! अशीं एका बंगाली प्रोफेसरांनीं सॅडलर कमिटी पुढें साक्ष देतांना म्हटलें आहे ! जातिवंत स्वाभिमानी व तडफदार लोक, शिक्षणखात्यांत विरळाच असल्याचा अनुभव जागोंजाग पाह्यला मिळतो ! कारण, शिक्षणखात्यांतहि जातीय निवाड्याचें (Communal award) वेडें पीक फार माजत चाललें आहे. त्यामुळें ठराविक अल्प वेतनावर जीवगुजराण करणारी ही सुशिक्षित (?) बलुतेगिरी अलबल्या–गलबत्यांच्या वशिल्यानें विद्यादानाच्या क्षेत्रांत महिन्यावारीचें, "मास-तर" म्हणून गुरुजन झाले आहेत ! बाटलेल्या महारणी-धेडणी गुरुमाऊल्या बनून, शिक्षणखात्यांत सावळा गोंधळ घालीत आहेत ! सॅडलर कमिटीपुढें साक्ष देतांना कांहींनीं अशी तक्रार केली आहे कीं, शाळांतील शिक्षणानें विद्यार्थ्यांचें शील सुधारत नाहीं व आपल्या कर्तव्याची जाणीवहि त्यांस होत नाहीं ! कमिटीनेंही ही गोष्ट मान्य केली आहे. पण आज बारकाईनें शोध-तपास केला तर उलट म्हणावें लागेल कीं, विद्यार्थी विद्यार्थिनींच्या शीला मोलापेक्षां, मास्तर मास्तरणींचेंच शील सुटत चाललें असून, विद्यार्थ्यांपेक्षां अगोदर त्यांचींच वैद्यकीय तपासणी करणें समाजहितदृष्ट्या जरूर आहे ! सध्यां शिक्षणखात्यांत कुणाला कांहीं ध्येयच दिसत नाहीं ! बरोबरच आहे ! रिस्ले सर्क्युलरची तरवार आमच्या शिक्षकावर व विद्यार्थ्यांवर सतत टांगलेली असल्यानें, जेत्यांचें शिक्षण म्हणजे जितांचें कल्याण करणारे कधीं असणें शक्यच नाहीं ! त्यांतून, प. पू. बादशहा पांचवे जॉर्ज, ह्यांना कलकत्ता युनिव्हर्सिटीनें दिलेल्या मानपत्राचे वेळीं, जें बादशाही भाषण झालें, त्याचा आधार घेऊन, शिक्षणाच्या मार्गानें स्वामिनिष्ठा वाढविण्याचें आपले धोरण इ. स. १९१३ च्या शिक्षण विषयक सरकारी पत्रकांत जेव्हां स्पष्ट केलें, तेव्हांच हिंदी विद्यार्थ्यांची स्वातंत्र्य लालसा धोक्यांत आली ! तेव्हां साम्राज्य शिक्षण म्हणजे स्वार्थत्याग नव्हे, हे प्रत्येक हिंदवासीयांनीं सतत लक्षांत बाळगिले पाहिजे !

प्राथमिक शाळांतील शिक्षण व शिक्षक ह्याबाबत जेवढें बोलावें-लिहावें, तेवढें तें अपुरें आहे ! उच्चवर्णीयांना महारा–मांगापासून विद्येचे पाठ मिळत असल्यानें, गणितागत अक्कलेचे खोबरे व अशुद्ध भाषेचे तोबरे, विद्यार्थ्यांना सक्तीनें दिलें जात

आहेत! ह्या अन्याय शाळेंतील नेमलेलीं पुस्तकें देखील प्रतिवर्षी करित असतात! आजचीं उद्यां नाहीं, उद्यांची परवां नाहीं. अशी एकसारखी स्थिति चालल्यानें, मुलांचे पालकहि खर्चामुळें बेजार झाले आहेत! ज्यांच्या पदरीं चार मुलें आहेत, त्यांना प्राथमिक शिक्षणाचा खर्च, दररोज रडकुंडीस आणित आहे! आणि इतका खर्च सहन करून, मुलांच्या माथ्यांत कांहीं ज्ञान मिळेल, तर शपथ! तेव्हां, अशाचि अर्धोकच्चीं प्राथमिक शिक्षणाची कुलपीमलई खाऊन, कशीबशी मराठी चार इयत्ता झालेलीं मुलें, हायस्कूलच्या होटेलांत, इंग्रजी ज्ञानाची मिसळप्लेट खायला येतात! व्याकरणरहित मातृभाषा आणि व्यवहाराला फारकत देणारे अंकगणित घेऊनच, इंग्रजीचा उंबरठा ओलांडणारे कोंवळे विद्यार्थी, मग युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेला बळी पडत राहातात! थोडक्यांत, शिक्षणांत असें किती तरी पाणसुरुंग पेरण्याचें काम शिक्षणाधिकाऱ्यांमार्फत चालू आहे! स्वतः ते दरवेशी बनून शिक्षणखात्यास अस्वलाप्रमाणें वेसण घालून, विद्येचा नाच चालविला आहे! प्राथमिक शिक्षणसागरांत, ग्रँट-इन्-एड्‌ची दोरी टाकून ही मच्छीमारी चालली आहे; परंतु त्यांत मासे येण्याऐवजी गाळच फार येतोय! आणि त्याचेच मग गणपति बनविण्याचें काम, इंग्रजीशाळांतून सुरू आहे!

## विद्यापीठांतील "वाघिणीचें दूध!"

सरकारी शिक्षणसंस्थांत इंग्रज प्रिन्सिपॉल किंवा इन्स्पेक्टर, हे जणुंकाय बँड मास्तरचेंच काम करीत असतात! अर्थात् हायस्कूलांतील टीचर्स्, म्हणजे निव्वळ ढोल बडवेच होतात! तिथेंहि त्यांना, मुलांना ठरलेल्या क्रमिक पुस्तकांच्या अभ्यासांतूनच वेडेविद्रे हातवारे शिकावे लागतात! आणि ही तासावारीची कामगिरी जर अपुरी राहिली तर मग परीक्षेचे पेपर्स् सांगणें व फोडणें, चारदोन ग्रेस मार्कांची आपापसांत आदलाबदल करणें, स्कॉलर्स् वशिल्यानें निवडणें, वगैरे अनुचित प्रकार 'सर' कडून अप्रत्यक्षांत सुरू होतात! कारण, पोटभरू शिक्षकांनींच सध्यांचें शिक्षणखातें भरलेलें आहे! त्यांना सुरक्षितता, बढती व पेन्शन ह्यांखेरीज दुसरेंतिसरें कांहीं दिसतच नाहीं! तेव्हां, अशा लोकांचाच अधिक गराडा पडल्यावर, एखाद-दुसरा देशाभिमानी शिक्षक, मोठा धूर्त व चाणाक्ष असला तरी तो एकटा काय करणार? आणि सह-व्यवसायी शिक्षण-

मंडळाच्या मत्सरग्रस्त दृष्टींतून तो सुटणार तरी कसा? विद्यार्थ्यांचें मन राजकारणाकडे वळविण्याला, त्याला इ. स. १९०४ च्या सरकारी शिक्षणपत्रकानें वावच मुळीं ठेवलेला नाहीं! एकंदरींत, आमच्या विद्यार्थ्यांचें वातावरण त्यांच्या स्वाभाविक उत्साहपूर्ण व स्वतंत्र मनोवृत्तीस जितकें विघातक करतां येईल, तितके करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे! परवशता आमच्या रक्तांत फार खोल जाऊन जशी भिनली आहे, तशी बुद्धिहि मंदावत चालली आहे! राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव करण्याची बुद्धि कॉंग्रेसनें आत्तांशीं कुठें दर्शविली आहे! यश मिळवील तो सुदीन!

इंग्रजीची प्रवेश परीक्षा पास झाल्यावर विद्यार्थी-विद्यार्थिनींना विद्यापीठांतील खऱ्या वाघिणीचें दूध प्यायला, बराच आपल्या जवळच्या पैशाचा नि त्याबरोबरच स्वतःच्या शरिराचा खर्च करावा लागतो! आणि विशेष म्हणजे तो ऐन तारुण्याच्या प्रौढ विद्यार्थी-जीवनांत फुकट खर्ची पडतो! वर्षावर्षाला युनिव्हर्सिटीचा हा 'व्हेल' मासा, लक्षावधि पदवीधर तरुण-तरुणींचीं अंडीं घालित राहतों! तरीदेखील लोकांचीं नवीन कॉलेजें काढायला मागणी ही आहेच! अबकारी खातें जसें भांग-गांजा अफू-दारूंची मादक दुकानें घालायला परवानगी देतें, तसेंच विद्यापीठांतील विद्या-वारुणीचे कलाल, ही कॉलेजांचीं मागणी, परवान्यानें मागत आहेत! आणि विद्यापीठाकडून ती पुरीहि होत आहे. तेव्हां विद्यापीठाची उच्च पदवी घेणें म्हणजे दारूच्या गुत्त्यांतून झिंगूनच बाहेर पडणें, सारखें झालें आहे! कारण, घेतलेल्या पदव्यांना बोज तो कसा राहिलाच नाहीं! B. Sc. आणि M. Sc. शाळा मास्तरहि होतात, डॉक्टर दलाल आहेत व व्यापारी परदेशचे एंजटहि आहेत. घिसाडी परभाषेंतील शिक्षणामुळें Mechanical Engineer होत नाहीं, रंगारी 'डायर' बनत नाहीं आणि चांभाराला कोणी Tannery च्या स्कॉलर्शिप्सहि देत नाहीं! पण विद्यापीठाकडून हें सारें विविध विद्यालंकार, डोंबलभर जवळचा पैसा खर्च केला म्हणजे जनतेला मिळण्याची खासा सोय सरकारनें केली आहे! पदवी मिळविण्याला जेवढा पैसा व आयुष्य खर्ची पडत राहतें, तेवढा कांहीं लभ्यांश विद्यार्थ्यांच्या पदरांत पडत नाहीं. फारकाय पण, शिक्षणाप्रीत्यर्थ खर्चिलेली वित्त-जीविताची हानि, त्यांना आपल्या उभ्या जन्मांतहि भरून काढतां येत नाहीं; हें कुणालाहि सांप्रतच्या विद्यार्थी-विद्यार्थिनींच्या चाललेल्या शारिरीक नि

मानसिक ऱ्हासावरून लक्षांत येण्यासारखें आहे! तेव्हां, विश्व-विद्यालयीन वाघिर्णीचें दूध, हें असें आहे!!

## विद्यालंकाराचें तेज !

मी माझ्या प्रिय वाचकांना प्रथमच कळविण्याची परवानगी घेतों कीं, या माझ्या सामाजिक शैक्षणिक-विषयावरील "विद्यालंकार"-या नाटकाचें तेज हें स्वयंप्रकाशित नसून तें परप्रकाशित आहे! कारण, विश्वविद्यालयीन चालू शिक्षण-पद्धतीवर माझी लिहीण्याची कुवत नाहीं-! आणि शैक्षणिक लायकी तर नाहींच नाहीं! अशा स्थितींत मी हा "विद्यालंकार" समाजांतील विद्वत्-रत्नापुढें ठेवित आहे! तेव्हां, त्यांनीं त्याची जरूर पारख करावी! व ज्यांनीं त्यांनीं आपल्या मनाचा निर्णय ध्यावा आणि ठरवावा कीं, चालू विश्वविद्यालयीन घडणावळीचा हा माझा "विद्यालंकार" खरा आहे वा खोटा आहे? मी त्याबाबत निष्कर्ष काढायला मुळींच बांधला गेलों नाहीं किंवा विद्यापीठांचाहि मिंधा नाहीं! उलट, गुलामीवृत्तींतल्या विश्वविद्यालयाकडून या जन्मीं मला पदवीधर होतां येण्यासारखी परिस्थिती असूनहि, ज्याअर्थीं ती मला पदरांत पाडून घेतां आली नाहीं, त्याअर्थीं मी स्वतःला भाग्यवान समजतों! आणि लोकमान्यांनीं दिलेल्या इषाऱ्याबाबत ऋणि होतों! केवळ त्यांच्याच प्रेरणेमुळें, मी आज बौद्धिक-गुलामगिरींतून विमुक्त झालों आहे! सबब, माझ्यापुरतां मी या नाटकाचा निष्कर्ष काढलेला आहे! अर्थात् तो इतरांच्या माथीं मारणारा मी कोण?

आतां प्रस्तुत नाटकाच्या विषयासंबंधीं माझा मी व्यक्तिशः खुलासा करावयाचा, तर तो असा करतां येईल कीं,—इंग्रजांनीं आम्हांस शहाणें करायचें ठरविल्यापासून तों आजतागायत—आम्ही दीर्घशहाणें होईपर्यन्तचा,—म्हणजे जवळ जवळ शंभर वर्षांचा त्यांचा शैक्षणिकदृष्टीकोनाचा दोरीगत इतिहास, चालू विश्वविद्यालयीन शिक्षणपद्धतीचा अभ्यास करून, तो सूत्रबद्ध कथानकांत, यत्किंचित्हि अतिशयोक्ति न करतां, अगदीं वास्तवतेनें यथार्थस्वरूपांत जनतेपुढें उभा केला आहे! इंग्रज राजकर्त्यांच्या अंतःस्थ धोरणानुरूप आजची चालू शिक्षण-पद्धति चालली असून, तिला सुशिक्षित विद्याद्रोही विद्वानांनीं उचलून आपल्या डोक्यावर नाचविली आहे! कुणी-कुणाला डोक्यावर

नाचवून घ्यावें हा प्रश्न व्यक्तिगत असेल! पण ज्याअर्थी आम्ही नाचवितो, त्याअर्थी तुम्ही ती नाचविलीच पाहिजे असें म्हणणाऱ्यांना सरळ वेड्याच्या इस्पितळाकडे पाठविणेंच जरूर आहे! कारण, वेड पुरवलें; पण घाल-वेड नको! तेव्हां, विद्यादानाच्या क्षेत्रांतील असें जे घालवेडे चालू शिक्षण पद्धतीचा उदो उदो करीत असतील, ते आपल्या देशबांधवांचा विद्यार्जनाच्या नांवावर सपशेल गळा कापीत आहेत, असें म्हटल्यावांचून मात्र राहवत नाहीं! स्वजन-द्रोही शिक्षण, हें कुचकामींच ठरणार! त्यांत, देव, धर्मद्रोह आहे, देशद्रोह तर फार आहे! अशास्थितींत देह झिजवीत हें चालू शिक्षण घेऊन फायदा काय? तर चिमूटभर लोकांचें पगारी कल्याण! तेव्हां, असली ही पगार कल्याणकारी विद्या, आम्ही आतां किती दिवस गिरवायची? भूगोल पाठ करा; पण त्यांतील देश मात्र माझा म्हणूं नका! इतिहास वाचा;–(आतां शोधून; कारण त्याला केव्हांच दडपून ठेविला आहे!) मात्र, आपल्या पूर्वजांचे पोवाडे गाऊं नका! व्याकरणरहित अशुद्ध गचाळ अक्षरांत लिहा; पण लिहीण्यांतली स्वामिभक्ति एकनिष्ठपणानें पाळीत रहा! साऱ्या भाषांची कालवाकालव करीत, धेडगुजरी भाषेंत बोला; पण त्यांत १२४ (अ) (ब) ला जपा! तात्पर्य, इतकीं वर्षें आम्ही हेंच पाठ करतों आहोंत! देशाभिमानाचा दुसरा धडा, इंग्रज राजगुरु आम्हाला अजून शिकवीतच नाहीं! पहिले पाढे, पढ पंचावन! पुन्हां आपलें बे ए के बे!!

तेव्हां, आपल्या झालेल्या अभ्यासाची उजळणी जशी वर्षसामाहीनें हुषार विद्यार्थ्यांना पहावी लागते, तशीच ती आज शें-सव्वाशें वर्षांच्या इंग्रज गुरूकडून तुम्हां-आम्हांना अपूर्व मिळालेली, नीट आठवून पहा; असें सांगण्याची आज पाळी आली म्हणूनच हा विषय मी नाटकाकरवीं हाताळला! कारण "आजच्या शिक्षण संस्था म्हणजे एक भेसूर प्रदर्शन" अशी जेव्हां मी समाजा-समाजाच्या कोना-कोपऱ्यांतून 'आक्रोश–आरोळी' ऐकली, तेव्हांच मग मी त्या प्रदर्शनांतलें हें माझें चालू शैक्षणिक क्रान्तिकारक नाटक, सामुदायिक संतापाच्या सत्यस्वरूपांत लिहिलें! वास्तविक, असें नाटक लिहिण्याचा आधीं प्रसंग यावा, हे भगवति शारदेचें दुर्दैव नसून, तें आपलें आहे! भारतीचें नाहीं, तर तें या आपल्या गुलाम भारतवर्षाचें आहे! आणि त्याचेंच मी हें नाटक लिहून रंगभूमीवर पोपटपंची केलेली आहे! जें सुजाण असतील तें

पाहून शहाणे होतील ! अजाण असतील, ते मला गाढव म्हणतील ! म्हणून कांहीं वस्तुस्थितिवर खरा प्रकाश पडल्याविना राहाणार आहे थोडाच ? तो आज ना उद्यां उजेडांत हा येणारच ! तेव्हां " तसलें हें असें कांहीं " मी या नाटकांद्वारें उघड केलें आहे ! थोडक्यांत, मी माझ्या विद्येबद्दल, ही हाकाटी केली आहे ! आणि विद्येची हाकाटी करणें, हें नरजन्माला केव्हांहि अभिमानास्पदच, नाहीं कां ? अर्थात् नाटकाचें स्वरूप पाहूनच, काय तें उत्तर द्या !

या माझ्या नाटकांतील भूमिका, ह्या विद्यालंकारिक म्हणजे समष्टि-रूपकात्मक आहेत ! व्यक्तिचित्रण कुणाचेंहि नव्हे, हें पात्रांच्या नामकरणावरून विद्वज्जन ताडतीलच ! हां, आतां कित्येक वाक्यावरून जर कां कोणी या माझ्या विद्यालंकारांतील वस्त्राभरणांत आपण होऊन एखाद्या अभिलाषानें येऊं म्हटलें, तर मी त्याचे स्वागत करायला केव्हांहि तयार आहे ! कारण, माझा हा 'विद्यालंकार' माझ्या एकट्याच्या मालकीचा नसून, तो साऱ्या अबाल-वृद्ध-तरुण स्त्री-पुरुषांच्याच मालकीचा झाला आहे ! तेव्हां त्यांत ज्याला ज्याला म्हणून आपल्या मालकीचा कांहीं जिन्नस दिसेल, त्याला त्याला तो उचलून घ्यायला मी केव्हांहि मनाई करणार नाहीं ! कारण, विषय विश्वव्यापी असल्यानें, त्यांतील शिक्षणादर्श साधु-संतांचीं मी जशी उच्छिष्टें चाटली आहेत, तशीच शिक्षण शौंडांची आपल्या विद्यापीठाबाबतची अंतःस्थ मळमळहि, बाहेर निघाली आहे ! तेव्हां, हा मुखरसांतला पित्तांश पाहून, कुणाचा जर पित्तप्रकोप विकोपास गेला, तर त्यानें आपली प्रकृति अगोदर सुधारून घ्यावी ! एवंच, ज्याला जे फिट्ट ठरेल, त्यानें तें बेधडक या नाटकांतून आपलें म्हणून खुशाल वापरावें ! माझी त्याला ना नाहीं ! पण एक सूचना मात्र ही कीं, स्वतःचा जिन्नस ज्याजागेवर असेल, तेथूनच तो न्यावा ! जागा सोडू नये, म्हणजे आपली भूमिका अगोदर नीट पहावी ! मगच माझें-माझें म्हणावें ! एऱ्हवीं, मी कुणाचीहि मालकी अमान्य करणारा नव्हे !!

बाकी, प्रस्तुत नाटकांतील भाषा, रस-परिपोष, पद्यभाग, विषय-नाविन्य स्वभावाविष्करण, नाट्यतंत्रादिकाबद्दल, मला एक अवाक्षरहि लिहावेसें वाटत नाहीं. कारण, ज्याच्या त्याच्या घरचेंच चित्र ! नि दारचेंच शिक्षण !! डोकं ताळ्यावर

ठेवून नीट पाह्यलें, तर पटेल ! भडकून घेतलं, तर एक "शिक्षण-समंध" जागा झाला, असेंच मी म्हणेन ! जगाला, सांगेन-दाखवीनहि !

## युनिव्हर्सिटीची, म्युनिसिपालिटी करूं नका !

विश्व—विद्यालयान्तर्गत शैक्षणिक-क्षेत्रांतील ज्ञानशौंडांना, विनंति करून, त्यांना सूचित करावेसें वाटतें कीं, त्यांनीं भांडारकर-चंदावरकरादि ध्येयनिष्ठांचें स्मरण करावें ! त्यांनीं विद्यापीठाचें वैभव, आपल्या विनयशील प्राध्यायनानें आणि सुशील न्यायनिष्ठुरतेनें, अत्यंत उज्ज्वल असें वाढविलें ! ते तुम्ही चारदोन ग्रेसमार्कावारी, चोरापोरी करीत फुकट घालवूं नका ! तुम्ही पेपर्स् फोडीत नसून, विद्यापीठाचें पोट उघडून दाखवित आहांत ! त्यामुळें, मार्कांच्या बेरजा चुकवून तुम्ही आत्महत्त्या करण्यास प्रवृत्त केलेले,-मेलेले विद्यार्थी, विद्यापीठाचें उघडें केलेलें पोट पाहून, वर स्वर्गांत देवि सरस्वतीजवळ स्वच्छंद हंसत-खिदळत आहेत ! मुलींचीं धर्मान्तरें पाहून, विद्यापीठाची बदनामी करूं नका. कारण, विद्यापीठ म्हणजे एकादें 'लाल देऊळ' किंवा 'जुम्मामशिद' नव्हे ! विद्यापीठ हे विश्वभारतीचें क्रिडांगण नसून, ते तिचें पवित्र वास्तुमंदिर आहे ! त्यांत तिचें भजन पूजन चालूं द्या ! भोजन-शयन करूं नका ! तें ज्ञान-मंदिरच राहूं द्या ! वेश्येचें शयनमंदिर होऊं देऊं नका ! विसाव्या शतकांतल्या भाषेंत बोलायचें, तर युनिव्हर्सिटीची, म्युनिसिपालिटी करूं नका ! वशिल्यानें टेंडर्स म्युनिसिपालिटी देते, म्हणून तुम्ही तसें टेक्स् बुकें मंजूर करून युनिव्हर्सिटींत लावूं नका ! अशानेंच पेपर्स फोडावेसें वाटतात, मुलानां पेपर्समधील प्रश्न सोडवावेसें वाटत नाहीं, तर पास होण्याकरतां त्यांना ५।१० रु. पासून वरच्या नोटा सोडाव्याशा वाटतात, मास्तरांना प्राणांतिक धाक द्यावासा वाटतो, परिक्षकांनाहि नंबर लक्षांत ठेवावेसें वाटतात, आणि शेवटीं, बेंड फुटलें म्हणजे एखादी साधीभोळी विद्यार्थिनहि विद्यापीठावर फिर्याद गुदरण्याइतकी, बेहद्द जिथें चिडून जाते, तिथें मग एखाद्या नाटकी मामानें जर "**मुंबई युनिव्हर्सिटी ही गाढव आहे**" असें म्हणून विद्यापीठाची बदनामी न केल्यास, त्यांत आश्चर्य तें काय ? तेव्हां, असं होऊं नये, म्हणूनच प्रस्तुत नाटकाचा जन्म आहे. विद्यार्जनीय-विद्यापीठें, हीं सतत पवित्रच ठेवलीं पाहिजेत ! त्यांत काम करणारीं मंडळी ही सच्छिल,

सुस्वभावी, सुवीद्य, लोककल्याण तत्पर, निःस्वार्थी व देशाला स्वतंत्र करूं इच्छिणारींच हवींत ! अशानींच युनिव्हर्सिटीच्या निवडणूकीला उभें रहावे व निरलसपणें कार्य करीत असावे. अर्थात् या सद्हेतूनेंच मी हा माझा शैक्षाणिक "विद्यालंकार," विद्यापीठापुढें ठेविला आहे. तो सूडाचा ॲटम बॉंब (मृत्यूगोल) कोणीहि समजूं नये ! फार तर मी विद्यापीठांतील कारभारी मंडळीपुढें हा एक स्वच्छ बिल्लोरी आरसा धरीला आहे. तेव्हां, त्यांत आपापलीं प्रतिबिंबें पाहून जर कुणाला कांहीं खंती वाटत असेल, तर त्यांनीं विद्यापीठांचें कर्तृत्व व पावित्र्य, प्राणांतिक व्रतस्थ राहून सांभाळावें, म्हणजे मला एखाद्या युनिव्हर्सिटीनें **पीएच्. डी.** 'केल्याचें समाधान होईल !

## आभारोपकार

प्रथमत: मला आभारोपकारांचें ऋण, 'तेजस्वी शिक्षण' या निबंधाचें लेखक **श्री. हरि कृष्ण मोहनी,** यांचें कबूल करणें अवश्य आहे. कारण, प्रास्तविक–विभागाला त्यांच्या त्या निबंधान्तर्गत आधारभूत टीपांचा मला मुक्त हस्तानें उपयोग करून घेतां आला. सदरहू पुस्तक मी २४ सालापासूनच अभ्यासांत घेतलेलें आहे. सध्यां तें दुर्मिळ म्हणून मी हा विस्तृत परिचय करून दिला. सरकारी-दफ्तर, व वृत्तपत्रीय याबाबतची कामगिरी हीहि माझ्यापाठीशीं पुण्याई करून, माझी ह्याबाबत संरक्षित झाली आहे. प्रयोगदृष्ट्या '**गंधर्व नाटक मंडळी**' व तिचा निष्णात नटवर्ग, संगीतीकरणाच्या बाबतींत चाली देऊन आपल्या गान-नैपुण्याची जोड देणारे नाट्यरत्न **श्री. श्रीपाद गोविंद नेवरेकर**-एतावता दिग्दर्शक, संस्थेचे आद्यप्रवर्तक, विद्यमान चालक व गंधर्व ना. मं. चे प्रेक्षक वगैरे सर्वांचा मी ऋणि आहे. तसेंच, ग्रंथ-संस्करणाला प्रकाशक, मुद्रक, छायालेखक, चित्ररेखकादि माझा गुणी मित्रवर्ग, आपापसांतील व्यवहारोपयोगी आभारप्रदर्शनांत आत्मौपम्यबुद्धीनें आजच्या कालमान-प्रसंगीं हा राहणारच !

याशिवाय, गांजलेले प्राथमिक शिक्षक, निर्ढावलेले पदवीधर प्रोफेसर्स्, मुलांच्या खर्चानें संत्रस्त झालेले पालक, उनाड विद्यार्थी वगैरे साऱ्यांनींच मजवर आभारोपकरांचे ओझें लादलेलें आहे. तेव्हां, मी तें कोणालाहि उचलू देणार नाहीं. माझा मीच सर्वांचा "भारवाहक" राहणार आहे. "महाराष्ट्र-शारदा" मला ती शक्ति

देवो, एवढीच तिच्या चरणाजवळ मी प्रार्थना करीत असून, विद्या-वंचकांचा धिःकार करीत आहे! कारण, विद्या-ज्ञानांत कोरडेंच पारतंत्र्यांतील स्वावलंबन मला नको तर जळजळीत स्वातंत्र्यांतील देश-प्रेम हवें.

**दीर्घं न आयुः प्रतिबुध्यमानाः**
**वयं तुभ्यं बलिहृतः स्याम् ॥** अथर्व १२. १. ६२

सर्वांचा नम्र,
ज्ञानोपासक व कुविद्यानिंदक
**वि. ना. कोठीवाले, पुणें.**

धन त्रयोदशी
दि. २-११-४४
मुंबई.

---

**टीप :**—अंक २ रा, पान ४५, ओळ २५।२६ चा संवाद हा **'सरस्वती'**चा आहे. तर्कतीर्थ हा दृष्टिदोष—! तसेंच, 'सरस्वति' हा शब्द जुन्या रूढ वाङ्मयानुरूप मुद्दामच अंत्याक्षरानें ऱ्हस्व ठेविला आहे. विभक्ति-प्रत्ययानुरूप तो दीर्घ होतोच !—आणि आजला विश्वविद्यालयीन सरस्वतीचें तात्त्विक स्वरूप हें ऱ्हस्वच होत आहे, नाहीं कां? याशिवाय, काना, मात्रा, वेलांट्या, अनुस्वार, रफारादि प्रकार तर, छापखान्याचें मशीन साम्राज्य-यंत्राप्रमाणेंच धूम-धडाड चालत असल्यानें त्या सर्वांना कळत न कळत **'चलेजाव'**चा संदेश अहिंसापूर्वक पाळावा लागतो! सबब, अशा स्थानबद्धांना (चुकांना) मानवी प्रामाणिक परिश्रम, मुळींच कामीं येत नाहीं! कारण, ती एक यांत्रिक फंदफितूरीच होय! त्याला कोण काय करणार?

# माझीं नाट्य-रत्नें

## रंगभूमीवर आलेलीं

सं. महात्म्याचा सत्याग्रह
धर्मसंग्राम
विषय-तृष्णा
लग्ना अगोदर ?
मनु पालटला
छेडलेला छावा
सोन्याचा धूर

ग्रामोद्धार-गांवगाडा
गुरुकुल
लग्न लांछन
अन्याय ( बालसंगोपन )
वर्णसंकर
ताई तेलीण, इ० इ०

## आगामी

मल्हारी-मार्तंड
पहिला-पेशवा
गुरांचा बाजार
समाजसत्ता

त्रैलोक्य सम्राट्
गजान्त-लक्ष्मी
हिंदीः—श्रीरणछोडराय ( ठाकूरजी )

## नियोजित—नाट्यग्रंथ

पिवळे डाग
दुसरा पेशवा
राघोभरारी
विकतश्राद्ध
शरीरसंबंध
कला कीं शील ?

प्रतिसृष्टि
सर्पसत्र
गुलाम राजे
नातेवाईक
कोण कुणाचा ?
( मोंगलाई ) मराठ वाडा !

# विनंति

बोलपट संक्रमणस्थितींत आपल्या नाटक धंद्यावर जो परिणाम इ. स. १९३० सालापासून झाला, तो सर्वांबरोबर गंधर्व नाटक मंडळीवरही झाला. तेव्हां या परिस्थितींत **श्री. नारायणराव राजहंस** यांचेवरील निर्व्याजप्रेमामुळें व महाराष्ट्रांतील एक अत्युत्तम नाट्य-संस्था पैशांचे अभावीं बंद पडूं नये म्हणून सुप्रसिद्ध धन्वन्तरी **श्री. डॉ. रा. ह. भडकमकर,** एम्. ए.; एम्. डी. यांनीं संस्थेंत लक्ष घालून, आजतागायत ही "गंधर्व नाटक मंडळी" चालू ठेविली आहे. १९४४ सालीं या कंपनीला कोणीच चालक नसल्यामुळें मी ही सहजस्फूर्तीनें कठीण जबाबदारी, केवळ श्री. **डॉ. रा. ह. भडकमकर** व गु. **श्री. ना. श्री. राजहंस (बालगंधर्व)** यांच्याच कृपाशिर्वादानें पत्करून, गंधर्व नाट्य संस्था चालविली आहे. व याकामीं संस्थेचे सर्व जुने व नवे नट-मित्र आणि **श्री. अ. ग. ऊर्फ बापूराव ओळकर,** मॅनेजर यांचीहि मला आपुलकीची मदत होत आहे. नाटक बसविण्याकरितां श्री. **वि. ना. कोठीवाले** व श्री. **कृ. वि. भांडारकर** यांनीं जी मदत केली त्याबद्दल त्यांचेही आभार मानणं माझें कर्तव्य आहे.

श्री. **वि. ना. कोठीवाले** कृत हें नवीन शैक्षणिक सामाजिक नाटक "**विद्यालंकार**" मी विषय नाविन्यामुळें व त्यांच्या भाषाशैलीमुळें निवडून, आज तें रंगभूमीवर आणण्याचें धाडस करीत आहे. आणि या माझ्या धाडसाला महाराष्ट्र-रसिक-वृंदाकडून प्रोत्साहन व आपलेपणा मिळेल अशी मला आशा आहे. नाटकाकरितां श्री. **अनंतराव राजाध्यक्ष** (मालक रेक्स फोटो स्टुडिओ) यांनीं अगदीं तत्परतेनें फोटो काढून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

शेवटीं, या सर्वश्रेष्ठ '**गंधर्व नाटक मंडळी**'चे आधिदैवत श्रीकेदारनाथ यांची प्रार्थना करून या माझ्या नूतन साहसाला श्री. दादासाहेब भडकमकर, गु. श्री. बालगंधर्व व जनता-जनार्दन यांच्या आशीर्वादाची मी अपेक्षा करतों.

आपला नम्र,

**श्री. गो. नेवरेकर**

चालक : गंधर्व नाटक मंडळी, मुंबई.

## विद्यालंकार-मंजूषा—

सदरहू 'विद्यालंकार' या नाटकाचा प्रथम प्रयोग शनिवार ता. ५।१।४६ रोजीं ३॥ वाजतां ग्रँटरोड बॉम्बे थिएटरांत "गंधर्व नाटक मंडळी"नें केला. तत्प्रसंगींचें भूमिका-दर्शन.



### पुरुष भूमिका

| | | | |
|---|---|---|---|
| **गणुकाका** | भांडारकर | **तर्कतीर्थ** | वाईकर ( देशपांडे ) |
| **विद्याधर** | नेवरेकर | **ज्युईस** | भोंसले |
| **प्रो. आचार्य** | अभ्यंकर | **पो. इन्स्पेक्टर** | पुरंदरे |
| **गुरुराव** | पालखे | **चि. विश्वनाथ** | मा. नारायण |



### स्त्री-भूमिका

| | |
|---|---|
| **सरस्वति** | शंकरराव कुलकर्णी |
| **कु. विद्यागौरी** | कु. प्रमिला जाधव |

★ १ ★

## शारदा–स्तवन

[ केदार–ब्रह्मताल ]

**वाग्देवी वर–दान । स्वानंद सतत स्मरण ॥**
**अमृत–वचनिं । करूनि नमन ॥ ध्रु० ॥**

**त्रिगुण–मया गुण–निधान । मयूरासन, पद्मासन ॥**
**धवल हार, पंकज कर । शब्द–रसा आनंदिन ॥ १ ॥**

**शुभ्र सदा वसन वरित । ललित–नाट्य–गीत गात ॥**
**राग ताल, ज्ञान–रसा । ब्रह्म–वीणा झंकारित ॥ २ ॥**

[ गणुकाका चित्रगुप्ते यांची बाहेरील बैठकीची ओसरी. सर्वसाधारण कारकुनीधर्तीचे दृष्य–म्हणजे एखाद दुसरा फाटका–तुटका लोडतक्या, लहानशी गादी, मळकट सतरंजी, लहानसें डेस्क. बाजूला पान–तंबाखूचें तबक व पानदान. एक भले मोठसें जन्मांत कधीं न धुतलेले तस्त. तक्यावर कांहीं ठिकाणीं काळ्या शाईचे–शिऱ्याचे पडलेले डाग. एका कोपऱ्यांत जुन्या वळणावर ठेवलेली एक समई. भिंतीवर पंचांगें व एकदोन कॅलेंडरें लोंबकळत ठेवलेली. ओसरीच्या एका कोंपऱ्यांत विविध पादत्राणें अव्यवस्थित असलेली, तर एका कोंपऱ्यांत केरसूणी-काड्या झडलेला खराटा व त्यांतच विटी–दांडू, चारदोन गोट्या–बैदूल, रबरी फुटलेला चेंडू व देवदारी फळीची ओबड–धोबड क्रिकेट बॅट वगैरे लहान मुलांचे सामान दिसत आहे. गणुकाकांची चारदोन मुलें आपापल्या अभ्यासाचीं दप्तरें व त्यांतील पुस्तकें आळसांत जांभाया देत वाचित आहेत. "मोत्या शीकरे अ आ इ ई" म्हणून एक खखडलेल्या आवाजांत

ओरडत सुटतों; तर दुसरा "पळ रे भोपळ्या टुणूक् टुणूक्"—म्हणत साऱ्या ओसरीवर उड्या मारीत राहतो. त्यामुळें शाईची दौत लवंडते, दुसऱ्याची स्लेट-पाटी फुटते. तो ओरडतो व "आम्हाला त्रास होतो-" म्हणून सारेच आपापसांत भांडून मारामारी करीत राहातात. एकमेकांचीं दप्तरें उधळून, त्यांतलि पुस्तकें व पाठ-खर्डे कागद, पतंगाप्रमाणें उडवून लावतात. पाट्या फोडतात, बोरूच्या लेखण्या मोडतात व आपापसांत कुस्ती करून, शेवटीं सारी बैठक विस्कटून अव्यवस्थित करतात. एकाला उघड्या चाकूनें जरा कापले जाते. तोंच तो "आई ऽऽऽ ग-" म्हणून रडत राहतो! बाकीचीं मुलं त्याची उचलबांगडी करून, "चल आपण बाहेर खेळूं-" असें म्हणत त्याला ओढत फरफटत नेतात. चारदोन रक्ताचे डाग त्यामुळें तिथं पडतात. मुलें गेल्यावर तशा अव्यवस्थेंतच गणुकाकाची वडिल मुलगी विद्यागौरी ही आपली केशभूषा व पावडर स्नोदि प्रकार आरशांत पाहून करीत असते! वय तिचं १८, दिसण्यांत सुंदर. आज विशेष पोषाख केलेला. तिचं हें सौंदर्य-प्रसाधन चालू आहे, तोंच बाहेर जाण्याच्या तयारींत असलेला तिचा वडिल भाऊ विद्याधर, हा प्रवेश करतो. वेष कॉलेजिएन्सचा. ]

**कु० विद्यागौरी :** ( सौंदर्य प्रसाधन करीत )

[ भावगीत ]

**नव-मत समता शुभ-मांगल्या ।**
**—तरुणांत ऐक्य नांदाया ॥ धृ० ॥**
**भावना-प्रमोदा, भुलविसि माया ।**
**—फुलविला बाग मोहाया ।**
**ज्ञानाची नटली काया ।**
**—गा, राग-रागिणी गाया ॥ १ ॥**
**मधु भुलावणी मनिं चित्त-चकोरा जया ॥**
**विहरते आशा मी छंद-रसा घ्यावया ॥**
**ममताच जगा द्यावया ।**
**मग रुचिर शांतवन, प्रणयाच्या पाया ॥ २ ॥**

**विद्याधर :** ( प्रवेश करून, एकंदर दृष्य पहात ) कोण, विद्या ! अलिकडे तूं अशी नटवी छेल-छबेली केव्हांपासून झालीस ?

**विद्यागौरी :** ( लक्ष न देतां ) मी ना ? तूं बेकार बी. ए. होऊन, घरांत बसलास तेव्हांपासून. ( तोंडावर पावडर मारते )

**विद्याधर :** ( चिडून ) विद्ये, काय चालवलंयस हें ?

**विद्यागौरी :** माझं होय ? हें माझं-या विद्येचं सौंदर्य-प्रसाधन,-!

**विद्याधर :** ( सारा सीन दाखवीत ) आणि या असल्या अव्यवस्थेंत ? तोंडावर पावडरचा पफ मारण्यापेक्षां, अगोदर हातांत केरसूणी घेऊन ही जागा साफसूफ केली असतीस, तर आईचं काम तेवढंच हलकं नसतं कां झालं ?

**विद्यागौरी :** ( वेडावून ) अहाहा ! मोठ्ठाच आईचा कैवारी आहेस कीं, नाहीं ? तर मग तूंच हातांत केरसूणी घेऊन, लाग ना या उद्योगाला ?

**विद्याधर :** आणि तुला कुठं एवढा नट्टापट्टा करून जायचंय-?

**विद्यागौरी :** मला जायचंय आचार्य सरकडं !

**विद्याधर :** ( घड्याळ पाहून ) आत्तां आठ वाजतांच ! उजाडलं नाही तोंच !

**विद्यागौरी :** हो !

**विद्याधर :** हो ! विद्ये, काय काम आहे ग आचार्यांकडं ?

**विद्यागौरी :** ते आज आमच्या शाळेंतल्या गॅदरिंग-समारंभाचे नियोजित अध्यक्ष आहेत.

**विद्याधर :** असतील ! शाळेच्या गॅदरिंग समारंभाचा नियोजित अध्यक्ष म्हणजे कांहीं तुम्हा मुलांचा नियोजित वर नव्हे, कीं ऊठ-बस-जा-त्याच्याकडे ! विद्ये, तूं शाळेंत जाणार आहेस कीं त्यांच्या घरीं ?

**विद्यागौरी :** सरनीं मला अगोदर घरींच बोलावलंय ! नंतर ते नि मी-मिळून शाळेच्या बक्षिस-समारंभाला हजर राहणार अहोंत !

**विद्याधर :** अस्सं ! एकूण, शाळेच्या बक्षीसांची वाटाघाट त्यांच्या घरींच करणार आहेस वाटतं ?

**विद्यागौरी** : हो ! तो समारंभ आज सकाळींच आमचा ठरलाय !

**विद्याधर** : आणि मग रात्रीच्या कार्यक्रमांत, काय काय करायचं ठरलंय ?

**विद्यागौरी** : रात्रींचा माझा एक महत्त्वाचा डॉयलॉग–पीस ते घेणार आहेत. तेव्हां, मला हें आतां जायलाच हवं ! आठ पांच झाले. ( घड्याळ पाहून तडक निघून जाते. )

**विद्याधर** : ( सुस्कारत ) डॉय–लॉग पीस ! गॅदरिंग ! बक्षीस–समारंभ ! वा, विद्यार्जनाच्या नांवाखालीं काय पण हा शाळा–कॉलेजांतून सध्यां मुलां–मुलींचा धांगडधिंगा चालू आहे पहा ! आणि हा कां ? तर शाळेची व्यापारी बाजार–पेठ व्हावी म्हणून ! समस्त पढतमूर्खांच्या स्नेह–संमेलनांचं प्रदर्शन म्हणजेच हें शाळा कॉलेजांतून चाललेलें प्रतिवार्षिक गॅदरिंग–समारंभादि प्रकार होत ! या चालू प्रकारानें देवि शारदा जर विश्व–विद्यालयांतून पळाली नाहीं, तरच आश्चर्य !

[ भीमपलास एकताल. ]

**सगुण–विनय ना कुणांत ! स्नेहादर नच मनांत ॥**
**नवल गमत लोप होत । पढतमूर्ख व्हाया ॥ धृ० ॥**
**पंडितांत शून्य ज्ञान । पूज्य गुरूंत द्वेष जाण ॥**
**ज्ञानार्जन विद्यमान । शारदा नुराया ॥ १ ॥** (जातो)

[ विद्याधर निघून गेल्यावर त्याचे वडील गणुकाका चित्रगुप्ते हे निव्वळ कारकुनी म्हणजे जाडेभरडे धोतर नेसलेले, मांजरपाटाचा अंगांत सदरा, त्यावर सोलापूरी चेकचा साधा कोट, अंगावर उपरणें व डोक्याला रुमाल. तसेंच, कपाळाला भस्म व गंध लावलं असल्यानें त्यांचें स्नान नुकतेंच झालेलें दिसत आहे. उपरणें अंगावर घेत प्रवेश ]

**गणुकाका** : ( तोंडानं गुणगुणत ) श्रीरामराज रघुनंदन रामराम । श्रीराम राम भरताग्रज राम राम. ( सर्वत्र अस्ताव्यस्त–प्रकार पाहून ) शहरसफाई म्युनिसिपालिटीचं ऑफिस जसं कधिं केव्हांहि कुठं स्वच्छ दिसायचं नाहीं; तसंच आम्हां बेपारी बनियांच्या जमाखर्ची कारकुंड्याच्या पोरवड्या घरांत स्वच्छता अशी दिसणार नाहीं ! ( पान खाण्याच्या तयारींत ) ऊंः जाऊं द्या

झालं! आपली पान-तंबाकू चोळावी आणि चालू लागावी झालं, पेढीची वाट। रोजचाच हा सीन आहे झालं.

**सरस्वति :** ( कॉफीचा कप घेऊन प्रवेश. वेष जुन्या बाळबोध स्त्रीचा ) हें काय असं! कॉफी घ्यायची ना अगोदर?

**गणुकाका :** अरे, खरंच कीं--? विसरलोंच होतों मी अगदीं.

[ तो कॉफी घेतो. तिचं लक्ष पडलेल्या रक्ताचे डागावर जाते. ]

**सरस्वति :** ( रक्ताचे डाग पहात ) अगबाई! मुलांनीं आपापसांत आपली टाळकी फोडून घेतली वाटतं! हें इथं रक्ताचे डाग,---

**गणुकाका :** ( सुस्कारत ) ऊंः हाहि एक अलिकडचा सकाळचा अभ्यासच मुलांचा होऊन बसलाय! यावरून प्राथमिक-शिक्षणखातं, चांगल्या कसलेल्या गुंडांच्या हातीं आहे, असं नाहीं कां तुला वाटत?

**सरस्वति :** ( साश्चर्य ) म्हणजे? मुलांना मारामारीचं कां सध्यां शिक्षण शाळेंत मिळून राह्यलंय?

**गणुकाका :** अग, शिक्षणाचीच जिथं मूळ रडारड चालू आहे, तिथं मारामारीचा संबंध हा असणारच!

**सरस्वति :** तो कसा?

**गणुकाका :** ( सर्वत्र सीन दाखवीत ) हा अस्सा! बघ ही अभ्यासाची परवड! तीं फुटलेली पाटी, लवंडलेली शाईची दौत, पिचलेल्या बोरूंच्या माझ्या लेखण्या, उडालेले ते पाटखर्डे, फाटलेलीं तीं पुस्तकांचीं पानं--! बोल आतां? हा सारा शिक्षणाचा खर्च, आपण आपल्या ओढगस्त संसारांत दररोज करण्यापेक्षां अगोदरच तुम्ही आम्ही जर संतति-नियमनाचा आश्रय केला असतां, तर हा एकंदर सीन तुला मला पाह्यचा रोज पाळी कां आली असती?

**सरस्वती :** खर्चाचं मरो बापडं! पण मुलांनीं कुठं लावून घेतलं नसलं म्हणजे बरं! मारामारी करून, मुलं कुठं पसार झाली इतक्यांत--कांहीं कळत नाहीं!

**गणुकाका :** मुलं येतील ग! जातात कुठं तीं? लोकल--बोर्डातली अधिकारी मंडळी जशी आपापसांत भांडून, एकमेकांच्या ऊरावर बसतात, तशीच घरांत

आपलीं हीं मुलं भांडत असतात! आतां शिक्षणाधिकारी एखाद्या तरुण गतभर्तृका मास्तरणीकरितां म्हणून भांडतात; तर आपलीं मुलं दौत-लेखणी-करितां भांडून मारामारी करतात! एकूण, काय? सध्यांचं शिक्षण म्हणजे तुम्हां आम्हां आई-बापांचं अगदीं साता जन्मीचं पुढं ओढवलेलं मरणच म्हणायचं!

**सरस्वति :** पण असं चालू शिक्षणाच्या नांवानं ओरडून कसं बरं चालेल? मुळांत शिक्षण वाईट कां असतें? आणि इकडच्या दृष्टीनं मी म्हणत्यें, वाईट झालं असेलहि! पण मुलांना तर तें द्यायलाच हवं ना? त्यांना ठोंबे कां ठेवायचंय?

**गणुकाका :** नाहीं,—आपण त्यांना पुष्कळ बॅरिस्टर करायचं मनांत आणलं; तरी पण पैशाची बोंब आहे ना आपल्या घरांत? आणि सध्यां भुकेबंगाल बॅरिस्टर, ठोंबे प्रोफेसर, बडबडे वकील, निरुद्योगी डॉक्टर आणि मूर्ख मास्तर, ह्यांचा जो जागोजाग सुकाळ झालेला दृष्टीला पडतो, तो काय शहाण्यांचा बाजार म्हणून नव्हे? अग, आपल्या वाड-वडिलांची जुनी म्हण आहे कीं, "अगोदर बुद्धि जाते नि मग भांडवल जातं!"—पण या चालू इंग्रजी अमदानींत जर ही आतां फिरवायची तर असं म्हणतां येईल कीं, "अगो-दर जवळचं सारं भांडवल नाहींसं करावं आणि सर्टिफिकीट घेऊन बुद्धीचं दिवाळं काढीत जगांत खुशाल शंख म्हणून मोठ्या अभिमानानं मिरवीत राहवं!

**सरस्वति :** इश्श! पैशापरी पैसा खर्चून, सध्यां शिक्षणाचं असं कां चाललंय?

**गणुकाका :** अग, तूं आपल्या घरावरूनच परीक्षा कर कीं? बाहेर पाहूंच नकोस? आपल्या विद्याकडेच बघ ना? अगदीं बारशापासून तूं आणि मी दक्षता घेतली नि नांव ठेवलं विद्याधर! आज रडत-खडत बी. ए. झाला; पण घरच्या संसाराला कवडीची तरी मदत करतोंय कां?

**सरस्वति :** आज एक बेकारीमुळं त्याला ती करतां येत नसेल; पण उद्यां तो—

**गणुकाका :** (मध्येंच) कुठं पैशाची टांकसाळ काढणार आहे, वाटतं? अग, ज्याला आपल्या पोटापुरतं अजून नीटसं मिळवितां येत नाहीं, तो काय उद्यां बंब वाजविणार, तें दिसतंच आहे म्हणा!

**सरस्वति :** तर मग तुम्ही त्याला आपल्या हाताखालीं कां नाहीं ठेवित एखाद्या दुकानांत ?

**गणुकाका :** काय उपयोग ? जमाखर्चाच्या मोडी अक्षराचं तर राहूं दे, पण आधीं बाळाचं हस्ताक्षर तरी धड आहे का ? मराठी अक्षर पहावं, तर एखाद्या जुन्या शिलालेखाप्रमाणं ओबड–धोबड निं तेंहि पण अशुद्धच ! परवां त्याला मी सरळ "**पत्नि**" हा शब्द लिहायला लावला; तर त्यानं लिहीला "**पण ती**" ! आणि तूं म्हणत्येस कीं, त्याचं आतां लग्न करा ! अग ज्याला धड अजून, "पत्नि" हा शब्द लिहीतां येत नाहीं, तो उद्यां कसचा आपला संसार करून आपलं नि बायकोचं पोट भरणार ? फुकट पैशापरी जवळचा सारा पैसा गेला नि वडिलधारा मुलगा मात्र जन्माचा सुशिक्षित गाढव करून ठेवला !

**सरस्वति :** हें काय असं ? चालूं शिक्षणावर वैतागून कां आतां हा प्रश्न सुटणार आहे ?

**गणुकाका :** तर काय चालूं शिक्षण–पद्धतींत तूं नि मी कां आतां सुधारणा करणार अहोंत ? रहात्येंस लोकलबोर्डाच्या इलेक्शनाला उभी ? मी लढवतो मुंबई विद्यापीठाची निवडणूक !

**सरस्वति :** एकूण, शेवटीं विद्याधराला बी. ए. करून हाच का पश्चात्ताप करून घ्यायचा ?

**गणुकाका :** ( कपाळावर हात मारीत ) यापेक्षां, आतां समाधानाला दुसरी कुठं जागा आहे कां ? अग मी त्याला नेहमीं म्हणत असतो कीं, बाबारे निदानीची पावली गमावून कॉंग्रेसचा तरी वर्गणीदार हो ! हिंदुमहासभेच्या गोटांत जा; पण घरांत स्वस्थ माशा मारीत बसूं नकोस !

**सरस्वति :** विद्या फारसा असा घरांत नसतोंच मुळीं ! आणि असला,–

**गणुकाका :** ( मध्येंच ) पुरें ! सारं माहित आहे मला ! अष्टौप्रहर त्याचं नटणं–मुरडणं, छानछोकीचा शोक नि गचाळ कादंबऱ्यांचं वाचन ! ना एक धड अक्षर ना कांहीं अंगीं लिहीण्याची कुवत ! लहान भावंडांना उजळणी–मिळवणी शिकवील म्हणावं, तर हा सिनेमा नटींच्या नांवांचीच त्यांना उजळणी

शिकवीत बसतो! त्यामुळं, गौरीदेखील, "फिरवाना जरा डोळा"-म्हणून सायकल फिरवीत बंडगार्डनवर जाऊं लागलीय,-!

**सरस्वति :** मग त्यांत काय बिघडलं? मॅट्रिक झालेली पोर! सायकलीवरून ती हिंडायचीच!

**गणुकाका :** भाग्य माझं कीं, तूं तिला नटी व्हायचा अजून उपदेश करीत नाहींस!

**सरस्वति :** हें असं उपरोधिक बोलण्यापेक्षां, एखादं चांगलंसं स्थळ बघून, तिचं लग्न करून द्या ना? शेताला बुजगावणं नि पोरीला उजवणं,-हें केव्हांहि वेळेवरच व्हायला हवं, नाहीं कां?

**गणुकाका :** कुणी आतां तिचं लग्न करून द्यायचं? तूं कां मी? चांगलंसं स्थळ मिळावं, म्हणून आधीं पोरीला सुशिक्षित करायला गेलों आणि हुंड्याची रक्कम चालूं शिक्षणापायींच खर्च करून बसलों! पण आता लग्नहि जमत नाहीं आणि जवळ पैसाहि राहिला नाही! फार काय, पण पोरीला आतां लग्नाची सक्तीही करवत नाहीं! भय वाटतं!

**सरस्वति :** कां बरं? पोर तर आपलीच आहे ना?

**गणुकाका :** (गंभीर होत) असं फार तर तूं म्हण! पण मी कांहीं तसं म्हणायला आतां धजत नाहीं! कारण, पोरीला जन्म तूं आणि मी जरी दिला असला, तरी ती शिकून आतां "तुझी माझी" थोडीच राहिलीय?

**सरस्वति :** हें काय हें असं भलतंच बोलायचं? गौरी, मॅट्रिक झाली असली म्हणून काय ती आपल्या आई-बापाला विसरणार आहे थोडीच?

**गणुकाका :** इथंच तर तुझं बाळबोध वळण चुकतंय! मुलीला चालूं एकांगीं शिक्षण दिलं कीं, ती आई-बापाची मुलींच राहात नाहीं! ती होते आपल्या वाह्यात स्वतंत्र विचाराची! अग, एखाद्या मोलकरणीप्रमाणं, तुला ती तोंड टाकून घरांत बोलते, तें काय मी दररोज ऐकत नाहीं, होय? सांगायचं काय कीं, उपवर मुलीच्या वयाची अठरा वर्षं उलटली म्हणजे ती फडक्यांच्या "अटकेपार" गेलीच म्हणून समज!

**सरस्वति :** पण असं म्हणून आतां कसं बरं चालेल?

**गणुकाका :** तर काय तिच्याबरोबर सायकल घेऊन गांवभर भटकत फिरूं ? आणि मग आहे ही व्यापारी नोकरी एकदांची गेली म्हणजे पुढं काय करूं ? कर्ती–सवरती मुलं, एकवेळ बेकार बनून घरांत बापाच्या जीवावर आबतोबा राहून खातील; पण कमवता बापच, बेकार राहून घरांत बसला कीं, मग आटोपलाच सारा कारभार ! चिरंजीव बी. ए. बनून उनाडायला लागले ! चिरंजीवि मॅट्रिक होऊन बाहेरवासीण बनूं लागली ! बाकींच्या बाल गोपाळांकडं पाहिलं, तर ही तऱ्हा ! मग मी आतां स्वस्थ बसूं नको तर काय उड्या मारूं ?

**सरस्वति :** कांहींहि करा; पण पोरांची कांहीं तरी भावी व्यवस्था लावा.

**गणुकाका :** तुझी–माझी ते आतां व्यवस्था लावतील, इतकें ते दोघं आतां शहाणपणाच्या कळसाला जाऊन भिडलेले आहेत ! अग, तुला काय माहित आहे ? पण मला सारं कांहीं कळलेलं आहे ! ऐक. काय ग, गारीला दररोज भाड्याच्या सायकली कोण, कां बरं पुरवतो ? रोज तिला सिनेमाला पैसे कोण देतो ? या या अशा घरांत स्नो पावडरी कुठून येतात ? अंगावरले सिनेमा–नटींचे पोषाख तूं करून दिलेस कां मी ? सांग ना ?

**सरस्वति :** काय सांगणार मी ?

**गणुकाका :** नाहीं ना कांहीं सांगवत ? तर मग आतां चिरंजीवांच्या राहणीचा आणि रोजच्या वर्तनाचा पाढा ऐक. हा अष्टौप्रहर सिगारेट कुठून आणून फुंकतो ग ? इस्त्रीचे तलम नि उंची कपडे कोण याला पुरवितो ? सेंटस्–पोमेड हा दररोज टाळक्याला कसा चोपडतो ? नाटकं–सिनेमाच्या नादीं हा कां लागला ? तूं कधीं तरी या गोष्टींचा विचार केला आहेस कां ? तूं त्यांची आई सरस्वति आहेस, म्हणून विचारतो !

**सरस्वति :** हो ! पुष्कळ विचार केला आहे. इतकंच काय, पण मी दोघांना विचारलं देखील,—

**गणुकाका :** काय–काय–विचारलंस–सांग पाहूं ?

**सरस्वति :** कीं, तिकडून अवघे वर्षाचे चारशें–पांचशें रुपयेच मिळतात !

**गणुकाका :** म्हणजे दरमहा जेमतेम पांच–पन्नासच रुपये बापाचे येतात !

**सरस्वति :** हो ! त्यांतच तर सारा हा आपला वाढता संसार चाललाय.

**गणुकाका :** होय ना ? मग ही आपल्या पोरांची चैनचान चालते कशी ?

**सरस्वति :** त्यावर मुलं म्हणतात कीं, आम्ही बाहेरून पैसे मिळवितो म्हणून !

**गणुकाका :** नाहीं ! पैसे हे बाहेरूनच मिळवून आणायचे असतात; घरांत पैशांची टांकसाळ काढतां येत नाहीं, हें मला मान्य ! पण आपल्या पोरांचा असा कोणतां सद्गुण वाया चाललाय कीं, त्यावरून हीं दोघं बाहेर पैसे मिळवीतील तें–?

**सरस्वति :** कां बरं ? माझा विद्याधर तर बी. ए. पास आहे. तो म्हणतो कीं, मीं चार दोन मुलींच्या ‘ शिकवण्या ’ शिकवीत असतो.

**गणुकाका :** काय–काय–? विद्या, चार पांच मुलींना शिकवण्या शिकवीत असतो ? काय शिकवितो ग ? मला वाटतं त्या मुलींच याला कांहीं शिकवीत असतील; किंवा हा त्यांना भुलवीत नि तुला मात्र बनवीत असेल ! आणि हा गाढव जर शिकवण्यावर पैसे मिळवितो, असं जर तुला खरं वाटत असेल, तर एखाद दिवशीं चुकूनहि पैशाभराची भाजी यानं घरांत आणूं नये ?

**सरस्वति :** न कां आणेना ? त्यांत काय मोठंसं आहे ? उद्यां लगीन–कार्य झाल्यावर आपोआपच संसाराकडं तो लक्ष घालील.

**गणुकाका :** कुणाच्या संसाराकडं विद्या लक्ष घालणार ? आणि संसारांत लक्ष घालायला, त्याचं आधीं मस्तक ताळ्यावर आहे कां ? सरळ त्याला आपल्या धाकट्या भावंडांशीं नीट वागतां येत नाहीं, कां त्यांना जवळ घेऊन, **“ग भ न”** शिकवितां येत नाहीं ! सदानकदा लाज सोडलेल्या बोडक्या कॉमरेडप्रमाणं त्याचं–चालणं नि बोलणं !

**सरस्वति :** पण विद्याचं वागणं मात्र अजून सरळ आहे हो !

**गणुकाका :** ( उपरोधिक ) हो–हो ! सिगारेट फुंकित तो मुलींना शिकवितो ना ! तेव्हां मग वागणूक ही सरळ असायचीच !

**सरस्वति :** एकूण, विद्याच्याबाबतींत इकडचं म्हणणं तरी काय आहे ?

**गणुकाका :** माझं म्हणणं तें आणखी काय असणार ? पण माझा मुलगा बी. ए. आहे, हें सांगूनहि कित्येकांना तें खरं वाटत नाहीं ! बोल आतां ?

**सरस्वति :** यावर मीं काय बोलणार म्हणा ! आणि आपल्या मुलांना कोणीहि

जरी नांवं ठेविली तरी मी म्हणत्यें, कीं जगाच्या तोंडाला हात कां लावायचा आपण ?

**गणुकाका :** अग, हो ! तें सारं खरं ! पण जगाच्या तोंडाला हात जरी लावतां आला नाहीं, तरीपण रोजच्या व्यवहाराकरितां म्हणून जगाची मन-धरणी ही सर्वांना करावीच लागते ना ? उद्यां पोराला बायको नि तुला जांवई,– हें मी स्वर्गांतून कां खालीं आणणार आहे ? ते इथलेच या जगांतलेच पाह्यला हवेत ! पण हें त्या तुझ्या सुशिक्षित पोराला नि पोरीला कळेल, तेव्हांच ना त्यांच्या लग्नादिकांच्या भानगडी जमायच्या !

**सरस्वति :** गौरीला मी हें बोलत कां नाहीं ? दररोज सदान्‌कदा हाच माझा तिला एकसारखा उपदेश चालू असतो !

**गणुकाका :** पण तो तिला पटतो कां ? उलट, तुझीच ती रेवडी उडवीत असेल ! परवां तर तिनं मला स्वच्छच सांगितलं कीं, माझ्या लग्नाची तुम्ही मुळींच काळजी करूं नका ! कारण, मला दादाप्रमाणं बी. ए. व्हायचंय !

**सरस्वति :** पण " कॉलेजचा खर्च–" ? इकडून करणं, होणार आहे कां ?

**गणुकाका :** काय माझ्याकडून ? एक कपर्दिकाहि मला या दोघांच्या शिक्षणा-करितां म्हणून आतां खर्च करायची नाहीं ! आणि माझी तशी ताकदहि उरलेली नाहीं ! होत नव्हती ती सारी शेतवाडी, मुंबई युनिव्हर्सिटीच्या तिजोरींत या दोघां बहिण-भावाकरता ठेविली ! आतां अगदीं कफल्लक खंक झालोंय–ऊर्ध्वयेदिशे ब्रह्मणेनमः म्हणायला ! आहे या ५।५० रु. च्या नोकरींत, हा आपला संसार आणि या चार मुलांचं शिक्षण कसं करावं; याचीच मला सध्यां विवंचना लागलेली आहे !

**सरस्वति :** पण ती फुकटच नाहीं कां ? बाकींच्या भावंडांचं शिक्षण माझा विद्या करणार आहे.

**गणुकाका :** ( चिडून संतापांत ) हो–विद्या करणार आहे, शंख ! कॉलेजचा झालेला खर्च ज्याला अजून काढतां येत नाहीं, तो म्हणे आपल्या भावंडांना शिकविणार ! आणि तशी जर चिरंजीवांची सदिच्छा दिसती, तर दररोजचा हा ओसरीवरील सीन, तुला–मला कां पहावा लागला असतां ? बोल–! विद्या

म्हणे चार–दोन पोरींच्या शिकवण्या करतो–आणि घरांत पहावं, तो ह्या लहान भावंडांचाहि अभ्यास बघत नाहीं!

**सरस्वति :** त्यावर तो म्हणतो कीं, मी त्यांना इंग्रजीमधून शिकविणार.

**गणुकाका :** अगोदर, स्वतःचं इंग्रजी सुधार म्हणावं! अनंत स्पेलिंगाच्या सतरा हजार चुका करून बसतो! तेव्हां, मला अशी साधार भीति वाटूं लागलीय कीं, चार दोन वर्षांतच त्याला आपल्या विश्याबरोबर फिरून इंग्रजी पहिल्या इयत्तेंत पुन्हा घालावं लागणार!

**सरस्वति :** (साश्चर्य) म्हणजे, सध्यां इतकं कां "अर्धकच्चं-शिक्षण,"–मुलांना शाळा–कॉलेजांतून मिळतंय–?!

**गणुकाका :** अग, तूं सध्यां शाळा–कॉलेजाकडं पाहूंच नकोस! हा आपला घरचा–प्राथमिक–शिक्षणाचा खर्चच पहा, म्हणजे झालं!

**सरस्वति :** होय हो! एकेकांच्या प्राथमिक–शिक्षणाचा खर्च म्हणजे वर्षाला मीठ–भाकरींतलीं दहा–कुटुंबं पोसली जातील, एवढा सध्यां चालू आहे!

**गणुकाका :** अग, फार काय?–पण दररोज एकेकांच्या ह्या अशा फुटलेल्या पाट्या नि सांडलेल्या शाह्या बघून, लाखवेळां असं मनांत येतं कीं,–तुझी ती वर्षांची बाळंतपणं, रोजावर आलीं तरी चालतील; पण पोरांच्या प्राथमिक–शिक्षणाचा,–हा म्युनिसिपालिटी,–स्कूलबोर्डाचा पोरखेळ नको! बघ–बघ हा पोरांचा सकाळचा अभ्यास बघ? तूं त्यांची आई,–देवि सरस्वति–आहेस ना? बघ–बघ हें तुझ सरस्वति–मंदिरांतलं विद्या–दान बघ–!

**सरस्वति :** यांत मी तें काय पहाणार? फार तर आवरा–आवर करून मोकळी होणार! मला जर मुलांना शिकवतां आलं असतं,–

[ सामान सुव्यवस्थित करूं लागते. ]

**गणुकाका :** (मध्येंच) तर तूं आजच्या प्रमाणं माझी बायको म्हणून कधींच जवळ राहिली नसतीस; तर सरळ एखाद्या ॲड्मिनिस्ट्रेटिव्ह साहेबांच्या बरोबर मोटारींतून पर्वती चढली असतीस! नशिब माझं कीं, तुझ्यासारखी सालस नि साक्षर बायको मला मिळाली! अग, खरं जर विचारशील, तर निव्वळ तुझ्या करितां आणि त्या देवघरांतल्या देवाकरितां म्हणूनच मला या घरांत यावंसं वाटतं! बाकी. कोणत्याहि मुलाचा,–मुलीचा, मोह म्हणून मला

मुळींच उरलेला नाहीं ! ( दीर्घ सुस्कारा टाकून ) ऊं: ! जाऊं दे झालं ! श्रीरामराज रघुनंदन रामराम । श्रीराम राम–भरताग्रज राम राम ! ज्याचीं नशिबं, ज्याचीं त्याच्याजवळ ! आपण काय करणार म्हणा ! बरं, मी आतां जातों दुकानावर. कालचा रोजखर्डाहि पक्का करायचा राहिलाय ।

**पोस्टमन :** [ पडद्यांतून ] गणेश सदाशिव चित्रगुप्ते ( दोन पत्रें टाकतों. )

**गणुकाका :** ( पत्रें घेऊन, वाचतो ) काय, कुणाचं आहे पत्र हें—

"सप्रेम सविनय नमस्कारून सस्नेह विनंति–विशेष ही कीं, मी संपूर्ण पातंजलयोग सांख्यादि षट्–शास्त्रें, न्यायतर्कालंकारादि मीमांसा,– एवंच बृहत्शास्त्रादि श्रुति–स्मृति–पुराणोक्त व्युत्पत्ति महत्तम–शून्य अशी जी सांस्कृतिक तर्कतीर्थाची परिक्षा,–ती मी उत्तीर्ण होऊन, आज ना उद्या भगिनी–दर्शनार्थ प्रशस्ति–पत्र–समागमें पुण्यपत्तनास प्रयाण करून आगमन करीत आहोंत ! अखंड लोभवृद्धि करून सोडावी.

आपला विद्वान शालक
न्यायतर्कालंकार चूडामणि
**तर्कतीर्थ चिंतामणशास्त्री चिवडे.**
रा. बरुदिल्ला जिल्हा-?

इश्श ! लिहायला विसरले हें तर्कतीर्थ ! ( सरस्वतीस ) ऐकलंसच ! आपले बंधुराज संस्कृत–चूडामणि बनून, या विद्येच्या माहेर घरांत म्हणजे पुण्यांत– अर्थात् आपल्याकडे चार दिवस राह्यला येणार आहेत !

**सरस्वति :** ( सहर्ष ) कोण ? माझा चिंतुभाऊ वाटतं ? कोणती–कोणती त्यानं पदवी मिळविली–? फिरून, पुन्हा एकदां पत्र वाचा पाहूं ?

**गणुकाका :** ( पत्र हातीं देत ) वाचित बसा तुम्हीच आतां ! आपल्या बधूंची हीं पदवी संस्कृतमध्यें असून, व्यवहारांत मला वाटतं कीं, तो संपूर्ण गाढवच राहिला असला पाहिजे.

**सरस्वति :** अम्मल धांदरटच आहे तो !

**गणुकाका :** आणि पत्रावरून आचरटहि दिसतोय मला !

**सरस्वति :** ( अभिमानानें ) कलकत्त्याला तो शिकत होतां म्हणे !

**गणुकाका :** पण मूळांतला मूर्ख लंडनला जरी जाऊन आला, तरी तो इथं शहाणा कां ठरणार आहे ?

**सरस्वति :** आणि हें दुसरं पाकीटपत्र कुणाचं ?

**गणुकाका :** ( पाकीट पत्र फोडून मोठ्यानं वाचित ) थांब ! तुला वाचूनच दाखवितों ! हें माझ्या एका बाळपणाच्या सोबत्याचं पत्र आलंय ! त्यांचं नांव गुरुराव दीक्षित. मास्तर बेळगांव जिल्ह्यांतल्या एका खेड्यांत, शाळेवर हेड-मास्तर असतात. ऐक. बिचाऱ्याची कर्मकहाणी ! पत्रांत ते म्हणतात:—

"—या वर्षी माझा वडिल मुलगा गजानन हा मॅट्रिकच्या परीक्षेला बसला होतां. चांगला पासहि झाला होतां; पण रजिस्ट्रार करून मार्कांची बेरीज चुकल्यामुळें तो नजरचूकीनें नापास केला गेला. आत्तांच युनिव्हर्सिटीच्या रजिस्ट्रारकडून मला तार आली कीं, तो संस्कृतमध्यें पहिली जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलर मिळवून चांगला पास झालेला आहे; परंतु माझं दुर्दैव असं कीं, नुकतीच त्यानं नापास झाल्यामुळं, म्हणजे गजाननाचं नांव रिझल्टशिटमध्यें चुकून न छापल्यामुळं शेवटीं त्यानं आत्महत्या केली...!"

**सरस्वति :** ( साश्चर्यभीत ) काय म्हणतां ? गजाननानं आत्महत्या केली ?

**गणुकाका :** ऐक–ऐक–पुढं–!

—" सबब, या बाबत युनिव्हर्सिटीला कांहीं जाब विचारितां आला तर पहावं-एवढ्याच सल्लामसलतीकरितां म्हणून, मी पुण्यास चार दोन विद्वान अधिकाऱ्यांना विचारणा करण्यास म्हणून येत आहे. तशांत दुर्दैवानं, माझ्या एका तरुण मास्तरीण असलेल्या विधवा मुलीला शिक्षण–कंटक लोकल–बोर्डांतल्या एका हलकट सभासदानं पळवून कुठं नेऊन ठेवलंय हरिजाणें ! त्यामुळं आत्महत्त्या देखील करावीशीं वाटतें; पण पुन्हा माझ्यावर अवलंबून असलेल्या चार मुलींची आठवण होते......"

**सरस्वति :** सारंच नवल ! पण काय हो, पोरीला कशी बरं पळवून नेली असेल ?

**गणुकाका :** आमच्या वेळीं मुली शिकतच नव्हत्या! तेव्हां, त्यांना कसं पळवितात.—हें मला कसं सांगतां येणार? हां, आतां तुला जर शाळेंत जाऊन अनुभव घ्यायचा असेल, तर तो मला घेऊन सांग! ऐक हा बाकीचा मजकूर,—

—" बाकी, नवलविशेष म्हणजे आमच्या इकडील शाळाखात्यांतून कमालीचा गोंधळ माजलेला आहे. मुख्य म्हणजे कानडी—मराठी—वाद! त्यांतच पुन्हा पानपट्टीवाले गणेगंपे मेंबर्स म्हणून, सध्यां स्कूल बोर्डांत व म्युनिसिपालिटींत निवडून कामें करीत आहेत. त्यामुळें, आज आठदहा महिन्यांचा आम्हां शिक्षकांचा पगारहि तुंबलेला! उपवास करून अन्न सत्याग्रह केला. सारं कांहीं केलं! थोडक्यांत, सर्वच बाजूंनीं जीव कसा अगदीं नकोसा वाटूं लागलाय,—आम्हां प्राथमिक शिक्षकांचं पुरं मरण ओढवलंय"—जाऊं दे! पुढील मजकूर तर वाचवित देखील नाहीं!

तूंच वाच हें सारं पत्र! आणि हें पहा, कृपाकरून मुलांना कांहीं उणं—अधिक बोलूं नकोस! सध्यां मुलांना मरणाची भीतिहि वाटेनाशीं झालीय! काय जे व्हायचं असेल, तें त्यांचं होईल. तुम्हीं आम्हीं बोलून तरी उगाच त्यांच्या मरणाला कारणीभूत व्हा कां? बरं, मी आज शक्य तर रजा घेऊन येतों. तोंपर्यंत येणाऱ्या पाहुण्यांचा परामर्ष तूंच घे! जातो मी! ( खिशांतल्या घड्याळाकडं पाहून ) अरे. बापरे! बोल—बोलतां साडे आठ झाले! गेलं हे पाहिजेच! नाहीं तर शेट, हातांत नारळ द्यायला वाट पहात बसायचा! ( जातां जातां ) ही आपल्या " घरची गांवठीशाळा " जरा नीट—नेटकी करून, पोरांना जरा पहा म्हटलं; कुठं भटकताहेत तीं! श्रीरामराज रघुनंदन रामराम! श्रीरामराम भरताग्रज रामराम. ( गणुकाका जातात. )

**सरस्वति :** ( सारी आवरा—आवर करीत ) मुलं पण मुलं आहेत अगदीं! घर गोकुळासारखं असावं; पण तसंच तें गुण्या—गोविंदानं दिसावं, तरच त्याला भाग्य म्हणायचं—!

[ **पडद्यांत :** " ओ नो मि. ज्युईस, तसं नाहीं तें म्हणायचं. " ]

कोण? आला वाटतं आमचा हा थोरला लामणदिवा! काय काय बाहेरून घेऊन आलाय, कांहीं कळत नाहीं. ( पाहून ) अगबाई, हा आज कोण नवखा बुटपाटलोणशास्त्री बरोबर आणलाय?

[ विद्याधर हा एका हातांत छडी व दुसऱ्या हातांत नवयुगमालेचें पुस्तक घेऊन त्यांतील एक धडा मि. ज्युईस याला तो देत दोघेहि अभ्यासयुक्त प्रवेशतात. ]

**विद्याधर :** ओ नो ! मि० ज्युईस–अरे तस्सं नव्हे तें ! " पळ रे भोपळ्य टुणूक् टुणूक् ! पळ रे भोपळ्या टुणुक् टुणूक् ऽ.

**ज्युईस :** पल रे बोपल्या टुणूं–टुणूं ! पल रे मोपल्या,

**विद्याधर :** ( चिडून ) अरे मोपल्या नव्हे भोपळ्या,

**ज्युईस :** हां ! हां ! बोपल्या–पल रे टुणू–टुणू ! ( नाचतो व हुदडतो. )

**विद्याधर :** बोपल्याहि नव्हे भोपळ्या ! आमच्या घरांत सध्यां नाहीं; नाहीं तर तुझ्या डोक्यांत ठसविण्याकरितां म्हणून, मी तो तुझ्या टाळक्यावर हाणलाहि असता ! थांब, तसं नको तें पाठ करायला ! युईथ ॲक्टिंगच होऊं दे ! बैस असा बेडकासारखा ! ( तो लोळतो तें पाहून ) हां–हां–गाढवासारखा असा लोळूं नकोस ! ( त्याला तालीम देतो. ) आणि खेकड्यासारखा असा चालूंहि नकोस ! तर सरळ बेडकाप्रमाणं,......हं, असा ओणवा हो !

**सरस्वति :** अरे, ए बाबा विद्या,

**विद्याधर :** काय म्हणत्येस आई सरस्वति !

**सरस्वति :** हें रे तूं इथं काय आरंभिलंयस– ?

**विद्याधर :** हें होय ? हा नवयुग मालेंतल्या एका धड्याचा पाठ आहे. हं, म्हण ज्युईस,–" पळ रे भोपळ्या टुणूक् टुणूक्–" असं म्हणत मार साऱ्या या आमच्या ओसरीवरून इकडे–तिकडे उड्या ! सारवायला आमची आई आहेच इथं !

**सरस्वति :** थांबा, बाबा ! मला सारवण घालायला सध्यां वेळ नाहीं !

**विद्याधर :** आई, तुला फक्त ही ओसरीच सारवायचा त्रास पडेल ! पण तूं जर ही सारवली नाहींस, तर माझी ही " शिकवणी " कायमची अंतरेल, त्याची काय वाट–?

**सरस्वति :** कसली शिकवणी–? माकडाप्रमाणं उड्या मारायची, ही रे कसली तुझी शिकवणी —?

**विद्याधर :** डायरेक्ट मेथडची! अग, आई! सध्यां नव-युग-भुईमुग-चालू आहे ना? तेव्हां, त्यांत मर्कट-लीला ह्या तुला दिसायच्याच! अग, एवढ्याकरितांच तर 'आम्हीं बी. ए. बी. टी. होतों! यस गो ऑन मि० ज्युईस, घोक मोठ्यानं,-! " पळ रे भोपळ्या टुणूक टुणूक,—

**सरस्वति :** थांब! काय याचं नांव घेतलंस-? सुईस,—?

**विद्याधर :** नो-नो-मदर, ज्युईस! हा एक अस्सल ज्यू जातीचा मोठा मोटर शोफर आपल्या विद्यासागर धबधब्यांच्याकडं आहे! लोफड नाहीं, तर चांगला दीर्घोद्योगी आहे. लपंडाव पिक्चर पाहून, याला कांहीं ड्रायव्हिंग करणाऱ्या मुलींनीं प्रेम-पत्रं लिहीलीं आहेत, असं हा म्हणतो! पण ती दाखवीत मात्र नाहीं कुणालाच!

**ज्युईस :** णाय? टो टस्सा करणा चांगले नाय! हामी टे संमडा वाचणा करटां, टुज्याजवल मरेटी शिकेल आन मंग संमडाच आमी स्वोटा वाचील!

**विद्याधर :** ऐक, आई! म्हणजे हा जेव्हां आतां मजजवळ मराठी शिकणार, तेव्हांच मग तीं पोरींनीं पाठविलेलीं प्रेम-पत्रं हा वाचणार! मला वाटतं, तोंपर्यंत प्रेम-पत्रं लिहीणाऱ्या मुली, चार-दोन मुलांच्या आया-दाया सहज होतील!

**ज्युईस :** हरकट नाय! टस्साबी काई जाला, टरीबी विद्याढर लई चिंटाणाय! आमी मंग टेच्यांच मुलास्नी, " पलरे नवल्या टुणूक्-मुलूख-" (उड्या मारीत तीनचार वेळां म्हणतो)

**विद्याधर :** हां! हां! उड्या मार; पण नवऱ्याचं नांव घेऊन धडा चुकवूं नकोस! 'नवऱ्या-'च्या जागीं भोपळ्या म्हणायला हवंय दोडक्या-!

**ज्युईस :** लोंब रे दोडक्या बुळूक्-बुळूक्-!

**विद्याधर :** मराठी शिक्षणाच्या वाळक्या! अरे, तूं तर आतां नवयुग माला-कारांचाहि " गुरू " होऊं पाहतोयस मराठीच्या बाबतींत! घोकतांना गाढवपणा कर; एवढ्याच करितां हीं बुकं लिहिलीं आहेत! पण लेखका इतका बेताल कां होतोस? टी. डी. लंडन झाल्याशिवाय, तुला प्राथमिक-शिक्षणाचें रिंगण, या अशा लाथेच्या दुगाण्या झाडायला मुळींच मिळणार नाहीं, समजलं? नीट

धडा पाठ कर. उगीच माझ्या मेंदूतलं रक्त, तूं जातीनं ज्यू असलास, तरी तें माझ्या आईच्या देखत पिऊं नकोस !

**सरस्वति :** अरे पण बाळ, तूं चांगला बी. ए. झाला असून, तुला ही असली घोडदळाची शिकवणी शिकवायला लावलं कुणी ?

**विद्याधर :** दैवानं ! खरंच आई, माझ्या कर्मानं ही असलीं गचाळ पुस्तकं नि खव्याळ हे मिशापेरू विद्यार्थी, साक्षरतेच्या नांवाखाली शिकवावे लागताहेत ! शिवाय, हा पडला एका बड्या ॲडमिनिस्ट्रेटिव्ह साहेबांचा मोटार शोफर पण समर्था घरीचं श्वान-आहे ! तेव्हां, निदानची याच्याच वशिल्यानं कां होई ना ? पण कुठं एखाद्या शाळेंत हंगामी मास्तराची नोकरी मिळाली तर मिळेल ! नाहींपेक्षां, रोजच्या माझ्या चैनीला ही शिकवणी कांहीं वाईट नाहीं ! ऊठ मि. ज्युईस, चल काढ पाहूं एक पिला इत्ती.

**ज्युईस :** संमडी 'शिकवनी' खलास केलास ? काई कबिटा-बिबिटा शिकवटे का नाय ?

**विद्याधर :** "टुला संमडा शिकवटे !"-पण अगोदर सिगारेट काढ ?

**ज्युईस :** हां, टी काढटे ! पण टू आईचे डेखट बी. टी. ओढशेल-?

**सरस्वति :** ऐक त्याचं नि हो शहाणा ! परकीय असला तरी आदर-अनादर पहाणारा आहे !

**विद्याधर :** पण याच्या फादरची-म्हणजे आकाशांतल्या बापाची, नव्हे हो ! तर सख्ख्या सावत्र मानलेल्या जन्मदात्या पित्याची, हा केव्हांहि चुकून अवज्ञा करीत नाहीं ! ते याला सिगारेट देतात. हा ती पितो ! ( हंसत ) आमचा बाप फक्त पान-तंबाकूच चोळीत बसतो ! म्हणून तर आम्ही चोरून विड्या सिगारेट्स, बाहेर ओढून पितो !

**सरस्वति :** ( प्रेमळरागांत ) चांगलं करतोस बरं विद्या ! अरे तूं आतां लहान कां आहेस ? आत्तांच ते बोलून गेले कीं, पैशाभराची भाजीहि,—

**विद्याधर :** ( मध्येंच ) मी घरांत आणीत नाहीं, होय ना ? नाहींच आणणार मी-!

**ज्युईस :** अरे पन बाहेर भजी खाटस आन् मंग भाजीच कां म्हून नाय घरीं आणटे–!

**विद्याधर :** अरे बाबा ! कर्ता–सवरता बाप घरीं असल्यावर, मुलांना भाजी-पाला आणण्याची जरूर ? तूं आहेस बिन बाप्या ! तेव्हां, तुला वडिलांचं कृपा-छत्र कसं माहित असणार ? चल, सिगारेट काढ तूं ? आईच्या देखत प्यायला कोणतीच मला भीति वाटत नाहीं !

**ज्युईस :** ( सिगारेट देत ) अस्सॉं ! पी टर पाहूं आईचे डेखट,—

**विद्याधर :** ( सिलगावीत ) माझी आई याबद्दल मुळींच रागवणार नाहीं, कारण, तिला माहित आहे कीं, आपला मुलगा गाढव नसून मोठा बी. ए. आहे !

**सरस्वति :** आणि समज, मी रागावल्यें,–तर तुम्ही शिकलेलीं अलिकडचीं मुलं कां आईचे उपकार स्मरून, तिचे गोडवे गाणार अहांत ?

**विद्याधर :** जरूर ! जरूर ! आई, मी तर नेहमीं " आई थोर तुझे उपकार " ही कविता अजूनहि म्हणत असतो नि कुणालाहि ती शिकवीत असतो ! " निज न ये तरी गीत म्हणावे–" ( म्हणतो ) " कोण उगा करी मजपाजोनि" आतां सिगारेट–!

**सरस्वति :** पण तुझ्या लहान भावंडांना मात्र, तुला शिकवायची बुद्धि होत नाहीं ?

**विद्याधर :** बरोबर ! कारण, ती लहान आहेत ! आणि चालू शिक्षणपद्धति प्रमाणं, त्यांना मला शिकवितां येणार नाहीं ! मी केलेली घोकंपट्टी आणि त्यांत खाल्लेला मारक्या मास्तरांचा छडीचा मार,–पण तो काय भावंडांना शिकवीत मी पुन्हा पाठ करायचा ?

**ज्युईस :** पण काय रे विद्याढर, ये पुस्टकामंडी ए आईची कविटा कांणाय सिलेक्ट केली ? साला आईला कसा विसरला.

**विद्याधर :** कदाचित् नवयुग मालाकारांना आपली आई आठवत नसेल किंवा आई होणाऱ्या बाया, बाळंतरोगालाच पहावत नसेल ! म्हणून तर, " माकड वाजवी बॅन छान । अस्वल वाजवी तबला छान–" या असल्या गचाळ

कुचेष्टित–कविता, सध्यांच्या क्रमिक पुस्तकांतून मुलांना पाठ कराव्या लागतात कीं, ज्या प्रथम या ज्युईस सारख्या परकीय ज्यूलाच मराठीचं दैन्य म्हणून पाठ करायला हव्यात! हं, मि. ज्युईस! गोऑन, सिंगिंग नाऊ! माकड वाजवी बीन छान। अस्वल वाजवी तबला छान। चालू दे डान्सच्या ठेक्यावर! म्हणजे हां-हां म्हणतां सारा लोकलबोर्ड–म्युनिसिपल स्कूल्सचा कुंभारवाडा ओस पडून, एकेक मेंबर्सची लाथाळी युनिव्हर्सिटीच्या निवडणूकीला दुगाण्या झाडीत मुंबईला पळ काढील!

**ज्युईस :** ( नाचत ) माकड वाजवी बीन छान। अस्वल वाजवी तबला छान.

**विद्याधर :** ('टाळ्या वाजवून) शिक्षण मारी बोंब छान। पालक मारी बोंब छान. [ दोघेहि नाचूं लागतात. ]

**सरस्वति :** ( कानावर हात ठेवून ) बाई–बाई–बाई! लहान मुलं परवडली; पण तुमचा हा " शिक्षणाचा-धुडगूस "–नको! चालूं या गोंधळ तुमच्या ह्या पुस्तकांचा! हीं शाळेचीं पुस्तकं म्हणावी, कां मुलांच्या अभ्यासाची परवड समजावी–? मुलांच्या अभ्यासापेक्षां, कर्म कटकटच फार! मी आपली आंतच जातें कशी?

[ सर्वसामान–विशेषतः अभ्यासाचे–घेऊन सरस्वति जाते; नंतर ते दोघेहि टिवल्या–बावल्या करीत नाचत राहतात. मि. ज्युईस अधुन–मधून मोटार–हॉर्न वाजवितो, तोंच हातांत छोटीशीं पथारी घेतलेला व बगलेंत बॅग घेऊन तर्कतीर्थ चिंतामणशास्त्री चिवडे प्रवेश करितात. वय ३५ शीचा सुमार. डोक्यावर जरीचा रुमाल, लॉंगकोट, शुभ्र धोतर, जरीकांठीं उपरणें व पायांत पुणेरी जोडा–सनातनी–सुधारकी मिश्र–! ]

**तर्कतीर्थ :** अरे–अरे–हें काय? इथं माकड–अस्वलांची सर्कस कां उतरली आहे? कीं, दरवेषांची सभा–परिषद् चालली आहे! काय–आहे काय प्रकार हा?

[ दोघांचे लक्षच नसते, ज्युईस जोर–जोरानें म्हणतो व नाचतो. विद्याधर छडीच्या तालावर म्हणत, त्याला साथ करीत राहतो ]

अहो –अहो म्हटलं, गणेश सदाशिव चित्रगुप्त्यांचं हेंच घर आहे ना? ( विद्याधराच्या कानीं ओरडून ) कां हो माकड वाजवी.

**विद्याधर :** या हो कुंभार गाढव-! कोण तुम्ही ? तुमचा सैलाणी शांतिबारू मोकाट ओरडत सुटलेला पाहूला आलांत वाटतं ? या-या कुंभार राजे,

**तर्कतीर्थ :** ( साश्चर्य ) कुंभार राजे ?! अहो, शहाणे ! मी तर्कतीर्थ चिंतामण-शास्त्री चिवडे आलोंय, चिवडेशास्त्री-!

**ज्युईस :** अस्साँ ! ( खिशांतून अर्धा आणा काढीत ) ज्या टर मंग, डोन पैशाचा ! पन चांगला गरमा-गरम हाय ना ? मि. विद्याढर, ठांबूनश्यान जरा सोड. आपुन अगोडर चिवडा ये बॅगमंडला घेऊनश्यान खाऊं या !

**तर्कतीर्थ :** ( रागानं ) अरे ए चिवडीच्या, कुणाला रे चिवडा-विक्या म्हण-तोस ? आणि ही बॅग काय चिवड्याची आहे, होय ? अरे, यांत माझीं संस्कृतचीं पाठ्य-पुस्तकं आहेत ! लेका, मी तर्कतीर्थ विद्यालंकार चिवडेशास्त्री आहे कीं चांगला !

**विद्याधर :** (विचार) तर्कतीर्थ ! हं, जरा संकेतार्थ सांगा पाहूं ? कोण अहांत आपण ? कुठं असतां ? काय करतां-खातां-पितां ? पुण्यास किं कारण आगमनम् ।

**तर्कतीर्थ :** अस्मादिक जेहेत्ते संस्कृतज्ञ असून, कलकत्ता युनिव्हर्सिटीचे तर्कतीर्थ आहेत !

**विद्याधर :** ( त्याच स्वरांत ) मग इथं पुण्याला कशाला,-" सरकारी-महा-महोपाध्याय-" व्हायला आलांत वाटतं ?

**तर्कतीर्थ :** नाहीं-नाहीं ! आम्ही आपलीं संस्कृतचीं पाठ्य-पुस्तकं ", शाळा-कॉलेजांतून सुरूं करायला म्हणून मुद्दाम उपस्थित झालोंय !

**विद्याधर :** ( आश्चर्यातिरेकांत ) अस्सं ? पण अजून इथं देसाई, मोडक, ओक वगैरे सारे संस्कृतज्ञ नांवालौकिकानं जिवंत आहेत. युनिव्हर्सिटींत, आपण बराच वरचा वशिला तर गांठलेला नाहीं ना ?

**तर्कतीर्थ :** कसला वशिला-?

**विद्याधर :** वशिलादि तुम्हांला कळत नाहीं ? अहो, मग कसचे तुम्ही तर्कतीर्थ ? अहो, महाशय वशिल्याशिवाय,—

**तर्कतीर्थ :** ( आठवून मध्येंच ) हां ! हां ! म्हणजे कुणीतरी रेकमेंड केल्याशिवाय,

**विद्याधर :** दॅट्स् इट्! विद्वत्तेच्या घमेंडीला इंग्रजी रेकमेंडेशन ही हवींच! तेव्हां, तुमचीं संस्कृतचीं पुस्तकं, वशिल्याशिवाय शाळा–कॉलेजांतून लावायला पुण्याचा मंडळी विद्वान आहेत, असं कां तुम्हांला वाटतं? अगदींच तुम्हीं नवखे दिसतां कीं? बरं, तुमची इथं कुठं ओळख–देख?

**तर्कतीर्थ :** ( साश्चर्य ) म्हणजे? हें घर आहे तरी कुणाचं?

**विद्याधर :** तुम्हाला कुणाचं घर हवंय?

**तर्कतीर्थ :** आम्हांला आमच्या शालकांचं,–गणेश सदाशिव चित्रगुप्त्यांचं घर हवंय!

**विद्याधर :** ( मोठ्यानं हंसत ) म्हणजे? तुम्ही आमचे मामा, डब्बल M. A. M. A. कीं काय? माम्मा–माम्मा,—

**ज्युईस :** ( गाढवा सारखा मध्येंच ओरडून ) मी टुजा माम्मा–! ओ,–ऽऽ–

**विद्याधर :** ए, मामाला पाहून असा गाढवाप्रमाणं ओरडूं नकोस?

**ज्युईस :** अरे पन बाबा, हामीं "कुंकू" पिक्चर पाहून मामाला गारव ठरवले!

**तर्कतीर्थ :** हं; पण मला पाहून, तुला मात्र एखाद्या गाढवाला 'मामा' म्हणायची वेळ येईल!

**विद्याधर :** नाहीं–तीं कुणीहि साधील! शिवाय, "बखत पडे बांका तो गद्धेकू केहना काका–" ही सुप्रसिद्ध हिंदी म्हण, आहेच कीं मामा पुन्हा शिल्लक!

**ज्युईस :** बराबर बोललास विद्याढर! ये असल्या गारव लोकांचीं बुकं जर साला युनिव्हर्सिटीज् लावटे, टर हामी मोटारड्रायव्हर्स लोकांनीं काई पाप करून–श्यान् सोरलाय! साला. हामी बी बुकं लिवटे!

**विद्याधर :** ( छडी मारून ) पण अगोदर शिक! 'ओ'ची 'ठो' फोडतां,–येईना नि लागला पुस्तकं लिहायला? ( मामास ) हं, मग काय मामा,—

**तर्कतीर्थ :** काय रे, तूं माझा भाचा विद्याधर कीं काय? बराच मोठा झाला आहेस कीं,–? अरे, गुलामा—

**विद्याधर :** हो! वर्षामागून वर्षे चालली आहेत ना? मग मी मोठा होणारच, नाहीं कां–?

---

**तर्कतीर्थ :** शिकला असशील बराच !

**विद्याधर :** यंदाच मी बी. ए. ऑनर्स झालोंय !

**तर्कतीर्थ :** ऑनररि बी. ए. झालास ? छान ! मग तूं आतां पुढं काय करणार आहेस ? सध्यां, एम्. ए. पी. एच्‌डी. चा अभ्यास करतोंयस वाटतं ?

**विद्याधर :** होय ! सध्यां मी " झारापकर टेलरिंग कॉलेज "मध्यें शिकत असतो !

**तर्कतीर्थ :** म्हणजे तें आपलं ' डेक्कन ' बंद पाडून, " वाडिया " बरोबरच सुरू झालेलं ना ?

**विद्याधर :** ( हंसत ) तें नाहीं बुवा आपल्याला कांहीं सांगतां येणार ! पण नेमके खिसे शिवून, चांगले लोकांचे गळे कसे कापावेत-हें ज्ञान जेवढं आम्हांला झारापकर टेलरिंग कॉलेजमध्यें लवकर मिळालं, तेवढं कांहीं दीड तपाच्या अध्यायनानं युनिव्हर्सिटी-कॉलेजमधून मिळालं नाहीं ! हो-नाहींतर नांवाला " विश्व-विद्यालय " पण त्यांतून बाहेर पडल्यावर, संपूर्ण पोटाचीच भ्रांत ! तसं नाहीं हं !

**तर्कतीर्थ :** इतकं कां छान चाललंय तुझं तें " झारापकर टेलरिंग कॉलेज ? " तर मग गड्या, आपण आपली " संस्कृतगंगाजळि " त्यांत लावणार ! सारे झारापकरियन्स आचार्य करून, अगडबंब विद्वान करून सोडतो !

**विद्याधर :** सोडा-सोडा ! जिरवा या पुणेरी विद्वानांची चांगली ! मस्तीला मामा आले आहेत !

**तर्कतीर्थ :** अरे मस्तीला नाहीं, चांगला वस्तीला आलोंय इथं ! बरं पण काय रे, सरू आक्का आंत आहे ना ?

**विद्याधर :** कोण आई ना ? हो हो, आंत आहे तर ! ( हांक मारून ) आई, अग ए आई-( सरस्वति येते तिला-) हे पहा आमचे मामा-तर्कतीर्थ बनून तुझ्या भेटीला आले आहेत !

**तर्कतीर्थ :** भेटीला नाहीं ! चांगला आठ पंधरा दिवस इथं राह्यलाच मी आलोंय ! पुस्तकं लावायचीं आहेत, व्याख्यानं द्यायचीं आहेत, नवीन् संशोधन करायचंय, खंडण-मुंडण-सत्कार विडंबन.—

**विद्याधर :** आई, सारं कांहीं मामांचं अजून व्हायचंय !

**तर्कतीर्थ :** आणि बोलायचं तर फार आहे ! एखाद्या "गलितकुष्ठ-महारोग्याला मदत करा-पण पुण्यांतल्या शिक्षण संस्थांना एक कपर्दिकहि देऊं नका." हा मुंबईकरांना इषारा द्यावयाचा,—

**विद्याधर :** तेव्हां, आई ! तूं प्रथम मामाला आज बोंडल्यांतूनच चहा पाज.

**तर्कतीर्थ :** नाहीं ग आक्का ! चांगला डब्बल कप चहा हवा आपल्याला ! कारण, जमलं तर मी इथून लग्नच करून जाणार आहे !

**सरस्वति :** होय कां ? रहा कीं मग आनंदानं !

**विद्याधर :** ठीक आहे ! आम्हांलाहि मामांच्या राहण्यानं, करमणूकच होणार आहे !

**तर्कतीर्थ :** अरे करमणूक कसली घेऊन बसलाहेस ? मी तुला सबंध संस्कृत-धातुकोष-रूपावलि'च समजाऊन सांगेन !

**विद्याधर :** नको ! ती मी तुमची तुम्हालाच मुखोद्गत करायला लावीन !

**ज्युईस :** मंग ह्यामींबी मामासंगती शिकेल !

**विद्याधर :** आई, अग तूं उभी कां ? मामाला चहा दे—

**सरस्वति :** बरं पण अगोदर सगळेच आंत चला पाहूं ? चहा घ्या आणि मग ठरवा काय तें आपापसांत !

**तर्कतीर्थ :** हो-पण आक्का ! तुझा चहा मधुपर्की झाला पाहिजे बरं कां ? म्हणजे असं कीं, पूर्वी घरीं एखादा अथिति किंवा जांवई आला म्हणजे त्याला हरणाचं मांस रांधून वाढीत असे.

**विद्याधर :** पण सध्यां पाहुणा पाहिला कीं, तो अधणांत टाकायचा मधुपर्क करावा लागतो !

**सरस्वति :** पण माझा चिंतामणि पाहुणाहि नाहीं आणि जांवईहि नाहीं ! तो आहे घरचाच ! बरं, बोलत बसा थोडा वेळ ! मी हांक मारतेच चहा झाल्यावर !

(सरस्वति आंत जाते ).

**विद्याधर :** ठीक आहे ! तोंपर्यन्त मी मामांचं क्षेम-कुशल विचारून घेतों. हं, मग काय मामा ? मारा कांहीं थापा ? हो, मात्र त्या परिचित असाव्यात बरं कां ?

**तर्कतीर्थ :** अरे परिचित काय नि अपरिचित काय ? कुणीकडून त्या " लोण-कढ्या "–" शेणसड्या " असल्या म्हणजे झालं !

**विद्याधर :** तरी पण त्या सत्याचा विपर्यास करतील ना ? बोला आतां ? कलकत्ता–युनिव्हर्सिटी संबंधीं तुमचं काय मत आहे ?

**तर्कतीर्थ :** हें पहा, सध्यां त्या युनिव्हर्सिटीनं माझीं एकदोन संस्कृत पाठ्य-पुस्तकं लाविलीं असल्यानं,—

**विद्याधर :** ( मध्येंच ) बंगाली विद्यार्थ्यांची फारच कुचंबणा झाली असेल नाहीं ?

**तर्कतीर्थ :** ( अभिमानानं ) छे ! छे ! उलट, बंगाली विद्यार्थी माझीं बुकं वाचून, अधिक क्रांतिकारक झाले आहेत !

**ज्युईस :** काय करटे मंग बिचारे ! रद्दी बुकं वापरणापेक्षां, पिस्टूल वापरणा लई चांगला !

**विद्याधर :** बरं, मामा ! मुंबई युनिव्हर्सिटीसंबंधीं तुमचं मत काय आहे ?

**तर्कतीर्थ :** " मुंबई युनिव्हर्सिटी ही गाढव आहे ! "

**विद्याधर :** अगदीं बरोबर ! तुम्ही म्हणूनच हें ओळखलंत मामा ! आणि असं असूनहि तुम्ही आपलीं पुस्तकं युनिव्हर्सिटींत लावणार ?

**तर्कतीर्थ :** अरे, केवळ पैशाकरितां ! द्रव्य–शठ आहे ना मी ?

**विद्याधर :** ( साश्चर्य ) म्हणजे ? मुलांच्या अभ्यासाकरितां नव्हेच ? मामा,–

**तर्कतीर्थ :** अगोदर मला युनिव्हर्सिटीची अंतःशुद्धी करायचीय !

**ज्युईस :** टे संमडा टुमी लिवलेला घाण बुका बगूनश्यान, बॉम्बे युनिव्हर्सिटीच टुमाला एनिमा डेयेल !

**तर्कतीर्थ :** बरं, या सद्‌गृहस्थांचा आम्हाला परिचय करून द्या ना ?

**विद्याधर :** कुणाचा ? या ज्युईसचा ! हा एक इथल्या प्रसिद्ध ॲड्‌मिनिस्ट्रेटिव्ह साहेब बहाद्दुरांचा, रावबहाद्दुरी मोटर शोफर आहे ! या अगोदर हा एका बोटीवर नोकर होता ! त्रिखंड हिंडून आलाय ! जातीनं ज्यू असला, तरी पण हा हिटलरचा जानीदोस्त आहे.

**तर्कतीर्थ :** कोण ? तो रंगाऱ्याचं पोट्टा ना ? आहे माझ्या तो माहितीचा. "युद्ध केव्हां सुरू करूं–" म्हणून त्यानं मला पत्र देखील पाठविलं होतं.

**विद्याधर :** ( मोठ्यानं हंसत ) काय सांगता काय, मामा ? कां थाप मारतां ?

**तर्कतीर्थ :** नाहीं रे ! तो शॉचा जांवईच होणार होतां !

**विद्याधर :** कोण हिटलर ? असं कां ? बरं; तेव्हां याच्या वर्गीनंच मी सध्यां पांच सहा ज्यू मुलींच्या शिकवण्या करीत असतो !

**तर्कतीर्थ :** तर मग तुला प्राप्तीहि पण, मुलींकडून भरपूर होत असेल !

**ज्युईस :** हां ! संमध्यास्नी हा संगं फिरायला नेटे आन मंग हवा खाट बसटे !

**विद्याधर :** ज्यू पोरींकडून नि प्राप्ती ? पण बरी होते मामा ! घरांत म्हणाल तर एक शिवराई देखील वडिलांना देत नाहीं !

**तर्कतीर्थ :** कारण,–?

**विद्याधर :** कारण ? अहो, विनाकारण ! त्यांत एक दोन नव्याच आहेत ! आजकाल सज्जन विद्वानापेक्षां नटींचाच परिचय अधिक ठेविल्याशिवाय, जगांत कुणी–कुणाला ओळखत नाहीं ! परवां आमच्या एका कॉलजमध्यें असा प्रश्न निघाला होतां कीं, "जगांतील प्रसिद्ध व्यक्ति कोण ?"

**तर्कतीर्थ :** तर मग "जवाहर" किंवा "महात्मा गांधीजींचंच" नांव, विद्यार्थ्यांनीं घेतलं असेल ?

**विद्याधर :** छे ! छे ! मीनाक्षी ! ! तिचंच नांव झाडून साऱ्या विद्यार्थ्यांनीं घेतलं !

**ज्युईस :** लई चांगला ! कारण, टी आठ लाख लोकांची प्रियटमा जाहिराट डेऊनश्यान जाली हाय ना विद्याढर ?

**तर्कतीर्थ :** ( मिस्कीलपणें हंसत ) पण आपली नाहीं झाली बुवा अजून !

**ज्युईस :** अरे काई बोलटे चिवडे मामा ? टुमी ब्रह्मचारी–पिक्चर पायला नाय आजून ?

**तर्कतीर्थ :** छे ! छे ! मी ब्रह्मचर्याश्रमच जिथं कधिं पाहिला नाहीं,–तिथं ब्रह्मचारी कसा पाहणार ?

**सरस्वति** : ( आंतूनच ) विद्या ! अरे विद्या चहा घ्यायला आंत या पाहूं ?

**विद्याधर** : ( ओरडून ) आलों–आलों, आई ! चल ज्युईस, आमच्याबरोबर तूंहि थोडासा पी.

**तर्कतीर्थ** : ( साश्चर्य ) काय ? या ज्यूला तूं घरांत नेऊन कां चहा पाजणार आहेस ? भ्रष्टकार–सब गोलंकार।

**विद्याधर** : अहो, मामा ! सध्यां साऱ्याच लोकांनीं "विद्यालंकार" चढविल्यामुळं, हा असा सब–गोलंकार घरांत कालवावाच लागतो ! तुमचीं संस्कृत पुस्तकं महार–धेड, मुसलमान, चांभार नाहीं कां अभ्यासत ? उच्चवर्णीय–ब्राह्मणांचीं मुलं, आजला महार–मांगादि मास्तराकडूनच, "श्रीगणेशा"–गिरवून राहिले आहेत, तर आपल्या मातृभाषा मराठीच्या साक्षरतेचा खराखुरा पाया, आद्य ख्रिश्चन–मिशनरी पाद्र्यांनींच, या गुलाम भारतवर्षांत येऊन घातलाय !

**ज्युईस** : मि. चिवडे, टुमी आजूण कम्युनिझम्‌वरली बुकं वाचली नाय ? युई आर कंप्लीट कम्युनिस्ट !

**विद्याधर** : फक्त मीरत–कटाच्या खटल्यांतून, ढेंकणाप्रमाणं हा सुटला ! ए कम्युनिस्ट, चल अगोदर चहा पी ! तूं अजून आमच्या मामांचं काय पाहिलंयस् ? अरे, ते नांवाला तर्कतीर्थ आहेत; पण वागणूक जर विचारशील तर तुझ्यासारखीं कैक कोंवळी–आंवळी–जावळी कम्युनिस्ट पोरं, मामांनीं गांवोंगांव जन्माला आणून, ऑर्फन् सोसायट्या वाढविल्या आहेत !

**ज्युईस** : (हस्तांदोलन व हास्य) अस्सॉ ! ओ देन यू आर ग्रेटेस्ट कम्युनिस्ट,

**तर्कतीर्थ** : ( मध्येंच ) होल ऑफ दि वर्ल्ड ! यस् ! ऑफकोर्स्–तूं या माझ्या दिखाऊं सनातनी फॅसिस्ट वृत्तीवर जाऊं नकोस ! अरे, पोरा. सगळे "इझम्" पचविलेला मी एक स्पेशल सोशॉलिस्ट आहे सोशॉलिस्ट !

**ज्युईस** : अस्सॉ ! टर मंग टुमची आमची ढोस्टी जुललीच टर मि. टर्कटीर्थ ! हामी आमचा कम्युनिझम्, बायकामंडी, अंडी बगटे नि करटे !

**तर्कतीर्थ** : आणि मी माझा सोशॉलिझम तर, पोराबाळावरहि चालवतो !

**विद्याधर** : होय कां ? तर मग प्या आतां एकमेकांचा उष्टा चहा न् काय ?

चला आंत. ( ज्युईस व तर्कतीर्थ हातांत हात देत हंसत जातात. ) कां कीं कुणास कळे ? पण मामा आलेले पाहून, मन धास्तावलं ! मग आमच्या संसाराचं कांहीं नवीन नाटक होणार आहे, कीं मामा स्वतःचीं पुस्तकं युनिव्हर्सिटींत लावून, तिची म्युनिसिपालिटी करणार आहे ? काय मामांचा पायगुण असेल तो खरा !

[ बिहाग–तिताल. ]

**साहूं कां देवादिकांचा पाहुणचार ?**
**आत्म–नाशा अधमा खला ॥ धृ० ॥**
**पाहूं जगभार, अनाचार। मामा–विनाश जया !**
**तयां निंदीतांच भला ! ॥ १ ॥**

[ विद्याधर आंत गेल्यावर प्रो. आचार्य व कु. विद्यागौरी हातांत हात घालून बाहेर येतात. प्रो. आचार्यांच्या हातांत एक भला मोठा फुलांचा गुच्छ ! चाळिशींतला अप्–टू–डेट् गृहस्थ. कु. विद्यागौरीच्या हातांत हार ! हंसत–खिदळत दोघांचा प्रवेश.]

**विद्यागौरी :** ( हंसत–खिदळत ) हंसा नि लठ्ठ व्हा !

**प्रो० आचार्य :** सांगतो काय कीं, स्त्रिया म्हणजे निम्मा स्वतंत्र हिंदुस्थान आहे ! तेव्हां, तो अगोदर साक्षर व्हायलाच हवा ! स्वतंत्र स्त्री–हिंदुस्थान हे सुशिक्षित झालंच पाहिजे !

**विद्यागौरी :** खरंच झालं पाहिजे ! बरं पण काय हो सर,—आत्तांचा आपला मुलींच्या शाळेचा वार्षिक बक्षीस–समारंभ कित्ती तरी छान झाला, नाहीं—? काय पण मुली गायल्या नि नाचल्याहि पण—!

**प्रो० आचार्य :** छत् ! मला तें मुळींच आवडलं नाहीं ! एवढ्या थोरामोठ्यांच्या घरंदाज उगवर मुलीं नि त्यांनीं गेंदरिंगच्या निमित्तानं नाचावं म्हणजे काय ?

**विद्यागौरी :** त्यांतल्यांत्यांत, लेडी सुपरिन्टेंडेंटबाईनीं तर कहरच केला.

**प्रो० आचार्य :** आणि त्यांचा तो मास्तरणींचा स्टाफ्,—जणुं काय नटींचा संघच—! नको—नको हें स्त्री–शिक्षण नि तें त्यांचं आर्थिक–स्वातंत्र्य—!

**विद्यागौरी :** एवढी चाळिशी उलटलेली वृद्धा–कुमारी,—पण एखाद्या पोरी-सारखी नट्टन–थट्टन उड्या मारीत होती !

**प्रो० आचार्य :** बरोबर ! सारे म्युनिसिपल्–स्कूलबोर्ड मेंबर्स, समोर बसले होते ना ? शाळेचा तो वार्षिक अहवाल वाचतांना, ती ॲडमिनिस्ट्रेटिव्हसाहेबांना आपल्या नेत्र–कटाक्षानें सावध करीत होती, तें तूं पाहिलंस कां–?

**विद्यागौरी :** छे, हो ! मी कशाला तिच्या नेत्र–संकेताकडे पाहूं–? माझी आय–सर्व्हिस तुमच्याच व्यास–पीठावर चालू होती !

**प्रो० आचार्य :** म्हणजे, माझ्यावर नव्हेच वाटतं–?

**विद्यागौरी :** तुमचं लक्ष समारंभाकडं कुठं होतं ? तुम्ही तर अध्यक्षांच्या खुर्चीवरून लहान मुलींचे चेहरेच पहात बसला होतात !

**प्रो० आचार्य :** छे ! छे ! त्यांनीं म्हटलेलं तें "यमुनाजळिं–" हें पद मी नीट लक्षपूर्वक ऐकत होतों ! परकरांतल्या थोरा–मोठ्यांच्या पोरी, शाळेंतल्या गॅदरिंगच्या निमित्तानं जर अशा फुकटांत–नाचायाला मिळाल्या, तर पुढं मागं त्या "पर–करांत" राहूनहि एखाद्या सिनेमा कंपनीला मोफत लाभदायक व्हायच्या ! आपल्याला हें मुळींच पसंत नाहीं ! मी व्यक्तिशः असल्या गोष्टींचा निषेध करतों ! तिरस्कार दाखवितों.

**विद्यागौरी :** पण असं सध्यां केल्याशिवाय शाळेला जादा ग्रँटच जिथं मंजूर होत नाहीं, तिथं कुणी काय करावं ?

**प्रो. आचार्य :** बरोबर बोललीस ! नाटक कंपन्यांना स्त्रिया ठेविल्याशिवाय जसं नाटकाला उत्पन्न होत नाहीं,–शिव्या दिल्याशिवाय, वर्तमानपत्र चालत नाहीं, तसंच शिक्षण संस्थांना थोरामोठ्याच्या मुली नाचविल्याशिवाय कोणत्याहि शाळेला शिक्षणाधिकारी ग्रँटच मंजूर करणार नाहींत—!

**विद्यागौरी :** ( हंसत ) तसंच हेड्‌मिस्ट्रेस् ही आजन्म कुमारी राहिल्या-शिवाय शाळाहि पण चालणार नाहीं !

**प्रो. आचार्य :** थोडक्यांत; सब–गोलंकार केल्याशिवाय, कोणतीहि शिक्षण संस्था ऊर्जितावस्थेला येणार नाहीं ! तेव्हां, तूं हे सारं लक्षांत घेऊनच आपली

आवी शैक्षणिक-प्रगति करायचं ठरविलंयस ना ? विद्यागौरी, तुला मी स्पष्ट विचारतों कीं, खरंच का तूं बी. ए. व्हायचं नक्की केलंयस ?

**विद्यागौरी** : पण अगोदर मी आपल्याला असं विचारतें कीं, आपण मला कॉलेजचा खर्च देणार आहांत ना ? कारण, इत:पर मला माझ्या वडिलाकडून शिक्षणाकरितां एक पैचीहि मदत मिळणार नाहीं !

**प्रो. आचार्य** : ऊं: खर्चाचं तूं सोड ! अनाथ मुलं जशी एखाद्याचीं वर-कामं करून, वार-मधुकरीनं विद्या संपादन करितात; तशीच तुम्ही तरुण-मुलींनी "वर-कामं" करून आपलं शिक्षण पूर्ण करायला हवं ! बोल, तूं एखाद्याचं आधीं "वर-काम" करायला तयार आहेस कां ?

**विद्यागौरी** : हो ! मोठ्या आनंदानं मी वर-काम करीन; पण बी. ए. होईन ! एखाद्याकडं भांडीं घासेन, स्वयंपाक करीन; फार काय, पण मोलकरणी-प्रमाणं राबेन, नि बी. ए. ची डिग्री मिळवीनच !

**प्रो आचार्य** : वा ! इतकी तुझ्या मनाची तयारी झाल्यावर तूं बी. ए.च काय; पण इंग्लंड-अमेरिकेच्या झाडून साऱ्या पदव्या हस्तगत करशील ! शाबास, गौरी ! तुझ्यासारख्या शिक्षणेच्छु उपवर कुमारिका, जर अशा जिवावर उदार होऊन एक जात साऱ्या पदव्या पदरांत बांधूं लागतील, तर हां-हां-म्हणतां, या आपल्या देशाचं-पारतंत्र्य नष्ट होईल !

**विद्यागौरी** : तर मग मी जूनपासून कॉलेजांत नांव दाखल करायचंना ?

**प्रो. आचार्य** : बेलशक ! प्राथमिक होणारा सारा खर्च, मी करायला तयार आहे. पण हो,-याकामीं तुझ्या आई-बापाची समति आहे ना ?

**विद्यागौरी** : ऊं: त्यांच्या संमतिवर माझं आतां थोडंच अवलंबून आहे ? माझी मी आतां स्वतंत्र झालेंय !

**प्रो. आचार्य** : तरीपण तुझ्या भावाची,-! बाकीं, तूं आतां मेजरच आहेस—

**विद्यागौरी** : ( कुत्सित ) कुणाची-? विद्याधराची कां ? हिडित् ! तो एक बोलुन चालून बेकार बी. ए. ! त्याचं मी थोडंच ऐकणार ?

**प्रो. आचार्य** : अस्सं ! तर मग मी तुला असं वचन देऊन सांगतों की, तूं बेधडक बी. ए. व्हायच्या पंथाला लाग. वाटल्यास, तूं आज-उद्यांच हा प्रश्न

आपल्या पालकाकडून सोडवून घे ? वेळ प्रसंगीं, त्यांनीं जर तुझ्यावर फोर्स चालविला तर, बेलाशक हें घर सोडून माझ्या घरांत रहायला ये! कांहीं संकोच करूं नकोस! कारण, तुला माहित आहेच कीं, मी विवाहित असून, परमेश्वर-कृपेनें दोन मुलींचा बाप म्हणून, सध्यां हें असं शिक्षण-क्षेत्रांत, पवित्र काम करतोंय! जशा त्या दोन, तशीच तूं तिसरी!

**विद्यागौरी :** ( आनंदून ) अहाहा! आचार्य सर, कित्ती हो आपलं परोपकारी हृदय! शिक्षणाकरितां, आपण यःकश्चित् माझ्यासारख्या असहाय्य कुमारिकेला जी पैशाची मदत करीत अहांत, ती मी कुठं नि कशी फेडूं बरं!

[ काफी–तिताल ]

**प्रमुदित तव वचना, याचना।**
**मजला द्यावा, या अध्यापना ॥ धृ० ॥**
**ज्ञान–विलोभन. स्वावलंबन।**
**मला देऊनि बल–विद्या-धन ॥**
**युगमानाला ज्ञान-प्रसाधन।**
**विद्या–भवना, रमति अंगना ॥ १ ॥**

**प्रो. आचार्य :** ती कुठं नि कशी फेडायची तें पुढं पाहूं! पण तूं अगोदर हें घर सोडून माझ्याजवळ येऊन रहा! तुझ्या शिक्षणाप्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाचं काय ? ऊं: एका वर्षांतली माझी पेपर तपासणीची कमाई! फारतर तुझ्या-करितां आणखी एखादं गचाळ गाईडचं पुस्तक लिहून, जादा प्रसिद्धीनं तें मद्द विद्यार्थ्यांच्या माथीं मारीन! पण तुला वचन दिल्याप्रमाणं बी, ए. करीन! मग तर झालं ? कारण, स्त्रिया म्हणजे निम्मं स्वतंत्र हिंदुस्थान आहे; सबब, तें पदवीधर हें व्हायलाच हव! मी आतां जातों! ( जाऊं लागतो. )

**विद्यागौरी :** थांबा गडें! थोडासा चहा घेऊन चला! आत्तां इतक्यांत मी आईकडून, करून आणते! थांबा हं,–( ती आंत जाते. )

**प्रो. आचार्य :** ( पाहून ) हं, हा कोण म्हातारा इकडे येतोय! विद्यागौरीचा बाप तर नव्हे ?

[ चिरूट पेटवितो. गुरुराव दीक्षित मास्तर परगांवाहून आलेला. सबब

बरोबर छोटीशी घोंगड्याची पथारी व खांद्यावर पडशी असलेला प्रवेश करतो. वय ५५ वेष बाराबंदींतला. ]

**गुरुराव :** गणपतराव चित्रगुप्त्यांचं हेंच घर ना ?

**प्रो. आचार्य :** होय ! कुठून आलांत आपण ?

**गुरुराव :** मी बेळगांवकडून आलोंय ! माझं नांव गुरुराव दीक्षित मास्तर ! मी हलकर्णीच्या शाळेवर हेड्मास्तर आहे !

**प्रो. आचार्य :** अस्सं ! म्हणजे आपण माझे व्यवसाय बंधूच अहांत म्हणायचे !

**गुरुराव :** ( सहर्ष ) काय-? आपणहि मास्तरच अहांत इथं ?

**प्रो. आचार्य :** हो ! पण हा असा सूटा-बूटांतला ! प्राथमिक शाळेच्या मास्तरापेक्षां, जरा वरच्या दर्जाचा ! तरीपण मी मास्तर लोकांविषयीं अत्यंत आपुलकीनंच पहाणारा आहे ! परवां, तुमच्या मास्तरांच्या अन्नसत्याग्रहांत, मींहि उपोषण केलेला माणूस आहे. तात्पर्य, मास्तरमंडळीं भीक मागायला निघालीं, तर परवानगीनं मी माझी चौपदरी त्यांच्यापुढं करणारा आहे !

**गुरुराव :** सज्जन अहांत ! बरं, आपण इथं काय करतां ?

**प्रो. आचार्य :** मी इथं एका सोसायटी स्कूलचा प्रिन्सिपॉल ऊर्फ ' प्राचार्य ' आहे ! माझं नांव प्रो. नागेश एम्. आचार्य. M, A.; B. T.; T. D. लंडन; S. T. C.; LL. B. बॉम्बे; Ph. D. फॉरेन. शिवाय, मी मुंबई युनिव्हर्सिटीचा परिक्षकहि आहे.

**गुरुराव :** ( आश्चर्य ) काय म्हणतां ? आपण मुंबई युनिव्हर्सिटीचे परीक्षक अहांत ? ( मोठ्यानं गळा काढून रडत ) अरे, देवा ! काय रे माझ्यावर हा प्रसंग,-!

**प्रो. आचार्य :** काय झालं हो तुम्हाला रडायला ? मी परीक्षक म्हणून ?

**गुरुराव :** अहो, म्हणून तर मी तुमच्या नांवानं रडत इथं आलों ! ( संतापून रडत ) तुम्ही परीक्षक कसले ? निव्वळ कसाई, खाटीक, मांग, राक्षस अहांत ! अहो, तुम्हाला माझा एकुलताएक मुलगा मारायला कांहींच कसं वाटलं नाहीं, हो प्रोफेसर ! ( रडतो )

**प्रो. आचार्य :** काय चमत्कारिक म्हातारा गांजेकस, मास्तर आहे पहा !

**गुरुराव :** ( रडत ) अहो, ईश्वरसाक्ष मी गांजेकस मनुष्य नाहीं हो ! पण तुम्ही तरुण प्रोफेसर,–दारू झोंकून कां मुलांचे पेपर तपासतां नि त्यांना जिवानिशीं मारतां ?

**प्रो. आचार्य :** ( साश्चर्य ) म्हणजे ? तुमच्या एखाद्या मुलानं परीक्षेंत नापास म्हणून, आत्महत्या तर केली नाहींना ?

**गुरुराव :** होय हो ! पण तो नापास नव्हतांच मुळीं ! हा पाहिलांत कां खरा प्रकार–( तार दाखवीत ) ही पहा त्याची मागाहून आलेली तार ! अहो, चांगला तो जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर होतां हो ! ( ओक्साबोक्सी रडतो. )

**प्रो. आचार्य :** नाहीं, वाचतां तर तो नोबल प्राईजहि मिळवितां ! पण आता काय ? तो मेला ना ? सुटला बिचारा या शिक्षणाच्या चक्र-व्युहांतून ! अहो, मास्तर ! युनिव्हर्सिटी म्हटली कीं, ती साक्षात यमाची यमपूरीच असते ! आज जगांत विश्व–विद्यालयांचंच वाढतं, बडं प्रस्थ आहे, म्हणूनच परीक्षेच्यावेळीं हा असा हंगामी कत्तलखाना सगळीकडे उघडला जातो ! थोडक्यांत, परीक्षांचा हंगाम, म्हणजे हंगामी उघडलेला वांद्याचा कसाईखानाच म्हणानांत ! निव्वळ स्लॉटर–हौस. तेव्हां, दुभत्या गुरांचा नि हुषार पोरांचा चुकून हा असा फन्ना व्हायचाच !

**गुरुराव :** ( मोठ्यानं रडत ) अहो, प्रोफेश्वर, अगदींच कसं कसायाप्रमाणं बोलतां हो ?

**प्रो. आचार्य :** तर काय वेदान्त्याप्रमाणं तुमची समजूत घालीत राहूं ? बॉम्बे युनिव्हर्सिटी म्हणजे तुम्ही काय श्रीशंकराचार्यांच आद्यपीठ मानतां ? कां अमरत्वाचा वैकुंठ समजतां ? काय ? समजतां काय, विद्यापीठांना ? अहो, बोलून–चालून शिक्षणाच्या नांवाखालीं चाललेली ती एक बाजार–पेठ ! अनेकांच्या कोट–कल्याणाबरोबर, एखाद्याचं असं प्राणांतिक–नुकसान व्हायचंच ! तिथं मग तुमच्यासारख्यांनीं असं रडून–भेकून काय होणार ?

**गुरुराव :** खरंच कां कांहीं होणार नाहीं ? मला याबाबत काहींच कां युनिव्हर्सिटीला जाब विचारतां येणार नाहीं ? अहो, आचार्य प्रोफसर –

( म्हातारा स्फुंदून स्फुंदून रडतो )

**प्रो. आचार्य :** शहाणे असाल तर, मूग गिळून स्वस्थ बसा ! या कामीं मुंबई विश्व-विद्यालय कांहीं एक करूं शकत नाहीं !

**गुरुराव :** अहो, पण मुलांच्या मार्कांची बेरीज बिनचूक केली, तर कशाला असले प्राणघातकी प्रकार वाढतील हो !

**प्रो० आचार्य :** अहो पण त्यांनीं तरी बेरजा करून करायच्या किती? एक कां दोन? हजारों विद्यार्थ्यांच्या मार्कांच्या बेरजा व्हायच्या ! तिथं एखाद-दुसऱ्याच्या चुकायच्याच ! हें पहा, मास्तर ! युनिव्हर्सिटीचा रजिस्ट्रार हें असं मुद्दाम कां करतों ? नाहींबरं ! त्याचं काम अगदीं यंत्रासारखं चालूं असतं !

**गुरुराव :** काय म्हणतां ? मुलांच्या मार्कांची बेरीज, यंत्रानं चालतें ?

**प्रो० आचार्य :** युनिव्हर्सिटी हेंच एक भलं मोठं यंत्र आहे. आणि म्हणून तर जगांतल्या कोणत्याहि व्यापारापेक्षां, युनिव्हर्सिटींचा व्यापार, हा कमालीचा फायदेशीर असा विद्यार्जनाच्या नांवावर राजरोस चालूं आहे ! तेव्हां, शहाण्यानं यंत्राच्या वाटेला सहसा जाऊं नये !

**गुरुराव :** अहो पण मुलं अजून यंत्रांतून निघत नाहींत !

**प्रो० आचार्य :** ( तिरस्कारानं ) यंत्रांतून निघत नसतील; पण तुमच्या-आमच्यासारखें पालक, मुलांना या शिक्षण-यंत्रांत, आपण होऊन घालतातच ना ? मी म्हणतों,—क्षणभर तुमच्या मुलांच्या मार्कांची बेरीज चुकली असेल; पण तेवढ्या वेळांत तुमच्या मुलानं निराश होऊन जीव कां द्यायचा ?

**गुरुराव :** ( रडत ) पण त्यानं तो दिला; मग मी आतां काय करूं हो ?

**प्रो० आचार्य :** ( हिणवीत ) अशी जीव देणारी दुबळी संतति मुळींच जन्माला आणूं नका ! आणि आणली तर त्यांना चालूं इंग्रजी शिक्षण देऊं नका !

**गुरुराव :** ( मटकन् बसून. मोठ्यानं रडत ) अरे, राम ! कुठून मला माझ्या कुलत्याएक मुलाला इंग्रजी शिक्षण द्यायचा मोह झाला ! आग लागो या चालूं इंग्रजी शिक्षणाला ! देवा, धरणीकंपाच्या आपत्तींत हीं जगांतली सारी विश्व-विद्यालयें तूं एकदम गाडून कां टाकीत नाहींस ? माझा मुलगा,—देवा माझा बाळ गजानन— ( मोठ्यानं रडतो. )

**विद्याधर :** ( घाबऱ्या घाबऱ्या प्रवेशून ) कोण रडतंय हें ?

**प्रो० आचार्य :** हें तुमच्या इथं आलेले पाहुणे !

**विद्याधर :** काय झालंय त्यांना ?

**प्रो० आचार्य :** यांच्या मुलानं आत्महत्त्या केली !

**विद्याधर :** मग तुम्हांला पंचनाम्याला बोलावताहेत कां प्रेत यात्रेला ?

**गुरुराव :** अहो अशी माझी चेष्टा करूं नका हो ? पंचनामाहि झाला–आणि त्याची राखहि सावडून आलों !

**विद्याधर :** मग आतां कुणाच्या श्राद्धाचें पिंड पाडायचेंत–? युनिव्हर्सिटीच्या की प्रोफेसरांच्या ?

**प्रो० आचार्य :** ( मध्येंच ) मुलांच्या मार्कांची बेरीज चुकविणाऱ्यांच्या,—

**विद्याधर :** ( कुत्सित ) नांवानं रडतां होय ! रडा–रडा–रडा ! तिप्पट मोठ्यानं रडत रहा ! आणि युनिव्हर्सिटीच्या रजिस्ट्रार–कारकूनापेक्षां या प्रोफेसर साहेबांच्याच नांवानं प्रथम गळा काढून, मोठ्यानं रडा ! कारण, हेच आधीं शुद्धींत राहून, मुलांचे पेपर्स् नीट तपाशीत नाहींत !

**प्रो. आचार्य :** सत्याचा खून करून तुम्ही बोलतांहांत मि. विद्याधर ! अहो, पेपर्स् तर आम्ही सैल-भोंगळ हातानं तपासतोंच, पण जरुर तर आम्ही पेपर्स् फोडतों देखील ! आणि पेपर तपासायला तो एक कां दोन असतात ? पुरुषभर उंचीचे पेपर्स्चे ढिगारेच्याढिगारे, ठरलेल्या मुदतींत तपासून रिझल्ट लावावा लागतो, समजलांत ?

**विद्याधर :** मोठे उपकारच करतां कीं, मुंबई युनिव्हर्सिटीवर ! दर पेपरागणिक छन् छन् चांगले वाजवून घेतांत ? पण नाजूक अचूक नंबर लक्षांत ठेवून, विद्यार्थिनींसारखे जरा नाजूक हातानं, सैल शिसपेन्सिलींनं पेपर्स् तपासले, तर तुमचे पितर नरकांत पडतील कां ?

**प्रो. आचार्य :** पितरांच्या नर्कांचं तें लांबच राहिलं; पण आधीं आमच्या प्रेस्टीज्च्या नोकरीचं बघावं लागतं ! नुकतीच एका विद्यार्थिनीनं, युनिव्हर्सिटीवर फिर्याद लावलेली तुम्हाला कळलीच असेल ! स्त्री-दाक्षिण्य दाखवावं, तर हें असं होतं !

**विद्याधर :** कांहीं मला सांगूं नका! सारं कांहीं मला माहित आहे, (गुरु-रावास) ऊठा, बाबा! अगोदर हें सामान घरांत जाऊं द्या. पाहतों मी हें काय प्रकरण झालंय तें! चला अगोदर थोडासा चहा घ्या! (विद्यागौरी चहा घेऊन येते) शाबास! चहा आणलासच कीं तूं!

**विद्यागौरी :** पण मी हा प्रोफेसर साहेबांच्याकरितां आणलाय!

**विद्याधर :** (दरडावीत) अगोदर, पाहुण्यांना दे आणि घरांतून दुसरा आण!

[ती निमूटपणें गुरुरावांना आणलेला चहाचा कप देते व रागानं आंत जाऊ लागते. प्रो. आचार्य थंड होतात.]

थांब! पाहुण्यांचं सामान आंत घेऊन जा! (फणफणत रागानं ते सर्व आंत नेते)

**प्रो. आचार्य :** (तणतणत) कांहीं मला चहाची जरूरी नाहीं; हा पहा मी निघालोंच! (जाऊं लागतो)

**विद्याधर :** थांबा हो! येतांना इथं तुम्ही आपल्या पायानं आला; पण जातांना तुम्हाला माझ्या आज्ञेनंच जावं लागेल!

**प्रो. आचार्य :** बरं बुवा! तुमच्या आज्ञेनं जाऊं! काय म्हणतां? बोला?

**विद्याधर :** कां आला होतात इथं?

**प्रो. आचार्य :** मिस् विद्यागौरीला घरीं पोंहोचवायला!

**विद्याधर :** ती काय आतां परकरांतली पोर आहे वाटतं?

**प्रो. आचार्य :** परकरांतल्या पोरीपेक्षां, सध्यां उपवर मुलींकडंच आम्हाला जास्त काळजीनं पहावं लागतं!

**विद्याधर :** मग एवढं काळजीपूर्वक गौरीला आपण कुठं नेलं होतंत?

**प्रो. आचार्य :** "वनितां-कौमार्य एज्युकेशन सोसायटींत!"

**विद्याधर :** कां बरं?

**प्रो. आचार्य :** तिचं वार्षिक गॅदरिंग चालू आहे.

**विद्याधर :** अस्सं! अस्सं! म्हणजे तुम्ही तिथं, सालाबादी "गद्धेरिंग" करायला, गेला होतात होय?

**प्रो. आचार्य :** गॅदरिंगचं अध्यक्ष-पदच मला आज होतं ? मुलींना बक्षीसंहि मींच वाटली.

**विद्याधर :** आपल्या पदरच्या खर्चानं कां ?

**प्रो. आचार्य :** तें काय म्हणून ? ती संस्था काय माझ्या बापानं चालविलीय; म्हणून मी पदरचीं बक्षिसं, मुलींना वाटणार ?

**विद्याधर :** बापानं नसेल संस्था काढली; पण बायांनीं तर चालविलीय ना ?

**प्रो. आचार्य :** ( चिडून रागांत ) बरं, मग पुढं

**विद्याधर :** पुढं काय ? तिथं मग तुमच्यासारखे डोंगळ्या–मुंगळ्याएवढे प्रोफेसर, गोचिडीप्रमाणं जाऊन चिकटायचेच ?

**प्रो. आचार्य :** तुम्हांला चिकटायचं कां कुठं ? बोला ? ताबडतोब चिकटवून देतो ! ( तर्कतीर्थ व ज्युईस प्रवेश करितात. )

**तर्कतीर्थ :** तर मग मला पुस्तकं लावण्या इतपतच अगोदर चिकटवून द्या !

**विद्याधर :** देतां कां आचार्य ? आमचे मामा आहेत. त्यांचीं संस्कृतचीं पुस्तकं, —

**प्रो. आचार्य :** ( मध्येंच ) कुठं लावायचीय म्हणतां ? देतो लावून ! द्या माझ्याकडं धाडून.

**ज्युईस :** मि. चिवडेशास्त्री, आमी टुमाला प्रोफेसरकडं मोटारमंडून नेएल कवा चलटे–?

**तर्कतीर्थ :** आत्तांच निघूं या !

**प्रो. आचार्य :** चालेल ( विद्यागौरीं चहाचा कप आणते ) ओ-सॉरी गौरी, बेटा मला हा चहा मुळींच नको !

**विद्याधर :** घ्या झालं आतां ! मनांतून माझ्यावर गरम होण्यापेक्षां हा गरमागरम चहाच आपल्याला मनः शांति देईल ! घ्या, घ्या आतां ! लाजूं नका ! प्रोफेसर !

[ तो तिच्या हातून चहाचा कप घेतो व उभ्या-उभ्याच पितो. नंतर तो खिशांतील रुमाल काढित असतां, एक पाकीटपत्र हळूंच पडते. तत्क्षणींच विद्याधर ते उचलून घेतो. ]

**प्रो. आचार्य :** ( रुमालानं तोंड पुसीत ) मि. विद्याधर, तुमच्या-सारख्या सुविद्य ग्रॅज्युएट् तरुणानं असं कांहीं तरीच चालू शिक्षणासंबंधीं बोलावं हें आपल्याला बिलकुल पसंत नाहीं ?

**विद्याधर :** ऊं : ! जाऊं द्या हो ! मला कुठं तुमचं जांवई बनून राह्यचंय ?

**प्रो. आचार्य :** नाहीं ! तशी इच्छा असल्यास, सोय आहे ! दोन मुलीं आहेत मला !

**तर्कतीर्थ :** ( मध्येंच ) मग एक त्यांतली आम्हांला देतां कां ? करू या तुमचा—आमचा शरीर–संबंध !

**विद्याधर :** मग आमच्या मामांचीं पुस्तकं नाहीं कुठं लावली, तरी चालेल !

**प्रो० आचार्य :** नाहीं—नाहीं ! मी पुस्तकंहि लावून देतों आणि जांवई ही करून घेतों ! तेव्हां, तुम्ही मला उद्ईक घरीं येऊन भेटा ! मी जरा यु, टी. सी. कँपच्या गडबडींत आहे ! ( तडक जातो. )

**विद्यागौरी :** थांबा ! सर ! मीहि येते तुमच्याबरोबर ! ( जाऊं लागते. )

**विद्याधर :** थांब ! चाललीस कुठं ? आज घरांत पाहुणे आलेले ! आईनं, एकटीनं कुठं कुठं मरायचं ? जा, अगोदर आलेल्या पाहुण्यांना नमस्कार कर.

**विद्यागौरी :** पण मला रात्रींचे डायलॉग-पीस - म्हणायचे आहेत !

**विद्याधर :** त्याकरितां मी नवीन नाटक कंपनी काढीन, पण अगोदर घरांत आईच्या हातांखालीं कामाला लाग !

**विद्यागौरी :** ( हट्टांत ) नाहीं, पण मी जाणार !

**विद्याधर :** ( खिशांतील चाकू काढीत ) मग मी तुझं नाकच कापून घेणार !

**विद्यागौरी:** ( रागानं ) काप पाहूं माझं नाक ?

**विद्याधर :** जा पाहूं बाहेर ? चल, अगोदर दीक्षित मास्तरांना नमस्कार कर ! ( ती निमुटपणें त्यांना नमस्कार करते )

**गुरुराव :** अनुरूपवर प्राप्तिरस्तु !

**विद्याधर :** आतां मामांना नमस्कार कर ! ( ती तसं करूं लागते. )

**तर्कतीर्थ** : अरे, विद्या ! आतां हिला मी आशीर्वाद काय देऊं ? बी. ए. भवति म्हणजे कलावतीभव म्हणूं ? कां आपलं सार्वजनिक संतति नियमन प्राप्तुरस्तु ? ( आंत रडण्याचा सूर )

**सरस्वति** : ( आंतून ) अरे, विशा ! कपाळाला केवढीं खोंक पाडून बसलायस ? ( त्याला बरोबर आणते, तो रडत असतो. ) कोण, गौरी ! अग जरा हळदीचा डबा घेऊन ये पाहूं !

**विद्याधर** : काय झालं ग आइ-? ( ती आंत जातें. )

**सरस्वति** : अरे व्हायचंय काय ? मुलं बाहेर खेळत होती ! इतक्यांत कुठं सरकारचं "लष्कर" बाहेर पडलं ! त्याला हें बाळ, घाबरलं नि पळत इथं आलं ! तों याला तें जोतं लागलं !

**विद्याधर** : जोतंच लागलं ना ? लागायचंच तें ! यांत विश्याचा कांहीं दोष नाहीं ! अग, चित्रांतूनहि अलिकडे मुलांना लष्कर दिसेनासं झालंय ( भींतीवरील वर्णाक्षर मालेचा तक्ता हातांत घेऊन ) हें पहा ! आम्ही शिकत होतों, त्यावेळीं "ल" म्हणजे "लष्करा"चें चित्र होतं ! आतां आलाय "लसूण" !

**तर्कतीर्थ** : आमच्यावेळीं "त" म्हणजे "तरवार" होती !

**विद्याधर** : पण आर्म्स ॲक्टामुळं "त" म्हणजे "तबला" आलाय ! साधा "न" म्हणजे "नळ" ही पुल्लिंगी गेला आणि त्याठिकाणी स्त्रीलिंगी "नथ" चमकूं लागलीय ! यापेक्षां, शिक्षणांतला स्त्रैणपणा तो आतां काय उघड करायचा ?

**गुरुराव** : आणि केला तरी त्याचा सध्यां काय उपयोग ?

[ कु. विद्यागौरी हळदीचा डबा घेऊन येते. सरस्वति जखमेंत ती भरून पट्टी बांधतें. विश्वनाथ मोठ्यानं ओरडून रडूं लागतो. ]

**गणुकाका** : ( घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करून ) अरे, इथं अशी माझ्या घरांत रडारडी कां चाललीय ?

**विद्याधर** : कांहीं नाहीं काका ! विश्या रडत नाहीं , तर हें आपलं स्त्रैण झालेलं "प्राथमिक-शिक्षण" लष्कराला भिऊन रडतंय ! घाबरतंय ! !

**गणुकाका** : ( पाहून ) पण कपाळाला खोंक पडलेली दिसते !

**सरस्वति** : नाहीं ! तशी फारशी नाहीं ! पण आतां लवकर येणं झालं ?

**गणुकाका :** अग काय सांगूं तुला ? तिकडे मालकाची मुलगी दहा हजारांचे दागिने घेऊन, एका चांभार मास्तरबरोबर पळून गेली !

**सरस्वति :** कोण ! आपली द्वारका ?

**गणुकाका :** हो ! आणि म्हणून तर दुकान बंद करून घरीं आलों !

**गुरुराव :** छान ! जिकडे जावं, तिकडे हेंच सध्यां पाह्यला मिळतं !

**गणुकाका :** ( पाहून ) कोण ? आलांत दीक्षित ! या-या-( परस्परांना भेटतात. ) चला, आपण आंतच बोलत बसूं या,—

**तर्कतीर्थ :** ( गणुकाकांना नमस्कार करीत ) शालक, नमस्कार करतो म्हटलं !

**गणुकाका :** तुम्हीहि आलांत ? ! उत्तम !

**तर्कतीर्थ :** हो ! तर्कतीर्थाची परिक्षा मी उत्तीर्ण झालोंय !

**विद्याधर :** मग मामा पेढें काढा ना ? ( सर्व जातात. )



★ २ ★

[ बनेश्वरानजीकची एक अंबराई. सर्वसाधारण खाजगी मळ्यांतल्या एका बगीचाचें दृष्य. म्हणजे बागेच्या पूर्वेकडील भागांत एक छोटासा जाईचा मंडप. सभोंवताली कांहीं फुलझाडांच्या कुंड्या. पश्चिमेकडे एक दोन लहानशीं रोंपटी. मध्यभागीं लहानशीं विश्रांतिकरीतां केलेली झोंपडी. तिच्या समोर तुलसीवृंदावन. त्यापुढें छोटीशीं सतरंजीची वा घोंगड्याची असलेली बैठक. झोंपडीच्यामागून पाण्याची पन्हाळीं गेलेली दिसत असून, दूरवर अंतरावर कांहीं भाजी-पाल्यांचे वाफे असलेले स्पष्ट दिसत आहेत. दक्षिणोत्तर अंबराई. हिरवळीचा अस्पष्ट भास. थोडक्यांत एखादा इनामदारांच्या वहात्या मळ्याचीच आठवण व्हावी, असें एकंदर दृष्य, शक्य तर अधून-मधून पक्ष्यांचा किलबिलाट होत असलेला. मोट-हाक्याचें गुणगुणनें व कामकरी लोकांची श्रमगीतें-ह्यांचाहि अस्फूट मंजूळ नाद निनाद ऐकूं यावा. वातावरणहि सौगंधिक व निसर्गरम्य असलेले. लांबून कांहिंशा अंतरावरून बॉय-स्कॉऊट म्हणजे बालचमूंच्या जांबोरीचें बॅन्ड-वादन ऐकूं येते. त्यावरून जवळपास त्यांचा कॅंप उतरलेला असावा, हा भास बॅन्ड-वादनाच्या तालावरच मि. ज्युईस हा एक इंग्लिशसॉंग,-गाणें शीळ घेत म्हणत पण डान्सच्या धर्तीवर पावलें टाकीत, तोंडानं ऊस खात प्रवेश करतो. ड्रेस संपूर्ण नाईटचाच त्यानं केलेला. वेळ सायंकाळ-सूर्यास्ताची ! ]

**ज्युईस** : ( तोंडानं शीळ घेत व डान्स करीत. )
" व्हेन मिलीअन मॉऊथ्स् आर स्टार्व्हिंग ओ, लॉर्ड ! डिनाईटी डिश टू हूम ? होर्डेस ऑफ चिल्ड्रन, मदरलेस डाइंग ओ, गॉड ! बाऊल ऑफ मिल्क टू हूम ? "

[ बराच बेळ त्यांत तोंच करमणूक करून घेत असतो. नंतर दोन मुलें प्रवेश करून ]

**दोघजण** : ( एकाच स्वरांत ) " शाळेंत उंदीर पडले. प्लेगमुळें सुट्टी ! "

**ज्युईस :** ( ओरडणाऱ्या मुलांना पकडून ) अरे, बाबा ! सुट्टी मिलूनश्यान आज लई दिवस झाला ! साला, कशाला आट्टां ओरडटे ! कमऑन-आमी समद्यास्नी डान्स् शिकवटे.

[ प्रत्येकाला तो धरायला जातो; तोंच ते त्याला " हिडित " म्हणून तेथून पळ काढतात. विद्याधर प्रवेश करून, ज्युईसला—

**विद्याधर :** ( आवरित ] ए. घनचक्कर ! मुलांच्या मागं कां लागतोयस तूं ?

**ज्युईस :** अरे बाबा ! ए समडे टुजा भाईलोक सटावून सोडटे !

**विद्याधर :** अरे, सुट्टी असली कीं, मुलं ही त्रास देणारच ! अगोदर शाळा-कॉलेजिस्‌ना वर्षांतून सहा महिने सुट्टी ! त्यांत पुन्हा प्लेग, कॉलरा, हरताळ, देशभक्तांचे मृत्यू, मोठ्यांचं जनन-मरण, हिंदु-मुस्लीम दंगा, कर्फ्यू ऑर्डर्स, १४४ कलम ! शिवाय, हिंदु-मुस्लीम, ख्रिश्चन-पारशी हॉलिडेज्,

**ज्युईस :** ये समद्या घोटाळ्यामुळं, शालाला कुलुप लई लागटे.

**विद्याधर :** अरे, इथंच तर चालूं शिक्षणाची ' अस्ते-कदम ' वाढ चाललीय ! विद्या शिकतांना कुणी घाई कां करतात ?

**ज्युईस :** अरे ! पण विड्या शिकायची टर अगोडर शाला बंड करूनश्यान कसा चालेल ? साला, वरसाची फि डेयाची आन चार-महिणा साला-कॉलेजमंडी जायाचा, ए काय वेवार हाय ?

**विद्याधर :** ( गंभीर ) शिक्षण-संस्थांना इतक्या सुट्ट्या, या वर्षांतून द्यायलाच हव्यांत !

**ज्युईस :** कशाला टे ? काई मास्टरांची डोका बिगडटे कां मुलांचा मगज जाटे !

**विद्याधर :** सध्यां हें दोन्ही प्रकार, शाळा-कॉलेजिस् मधून पाह्यला मिळतात ! शाळेला डोक्याची नि विद्येला मेंदूची, आजला गरजच राहिली नाहीं !

**ज्युईस :** टर काय ए एज्युकेशनमंडी, समडाच बिन डोक्याचा कारभार चालू जाला हाय ?

**विद्याधर :** होय ! मात्र, तो विद्यार्जनाच्या नांवाखालीं !

**ज्युईस** : ( साश्चर्य ) अस्सॅं ? मरूं डे टर साला ए एज्युकेशन !

[ पूर्वोक्त सॉंग म्हणत नाचूं लागतो. ]

**विद्याधर** : तुला आतां नाचायला काय झालं! ( टप्पू मारतो. )

**ज्युईस** : अरे बाबा ! महिणाभर रजा मिलाली हाय, टो मजा टरी करून घेल ! पण ठोडा ठांब ! आमी टुला एक बॉंब-गोला डाखविटे ! ( तो जातो. )

[ सरस्वति व गुरुराव दीक्षितमास्तर, येतात. ]

**सरस्वति** : ( विद्याधरास पाहून ) विद्या, -

**गुरुराव** : नको वहिनी ! माझ्यासाठीं तूं कुणालाहि कांहीं एक सांगूं नकोस; तर मला आपला उद्यांच्या उद्यां जाऊं दे कसा ! मलाच इकडे येतांना वाईट मुहूर्त लागला !

**सरस्वति** : वाईट मुहूर्त नाहीं नि कांहीं नाहीं ! आल्यासारखा मुलाचा नि मुलींचा निर्णय घेऊनच, तुम्हाला भावोजी हें इथून जायला हवं !

**विद्याधर** : ( मिस्किलपणें ) बरोबर ! इथून मास्तरांना जायला हवं !

**सरस्वति** : विद्या, तूं या साऱ्या गोष्टी, नुसत्या हंशावारीच नेणार आहेस कां ?

**विद्याधर** : हंशा झालेल्या गोष्टी, हंशावरीच नेल्या पाहिजेत !

**गुरुराव** : ( उसासा टाकीत ) हो ! तेव्हां त्या आतां अधिक हंशा करणाऱ्या करूं नयेत, हे उत्तम ! आल्यापावलीं सरळ घरीं चालू लागावं, हें बरं !

**सरस्वति** : अरे, विद्या ! तूं इथं आल्यापासून असतोस कुठं ? आपल्याकडे हें पाहुणे कां आले आहेत ?

**विद्याधर** : मुलाच्या आत्म-हत्त्येचा जाब, युनिव्हर्सिटीला विचारायला

**सरस्वति** : मग, याबाबत तूं यांच्याशीं कांहींच कसं बोलत नाहीं ?

**विद्याधर** : कारण, तें मुळीं बोलण्यासारखं सध्यां नाहींच ! तुला काय वाटतं, मी या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करून राहिलोंय ! अग होणाऱ्या गोष्टी, होणाऱ्या काळानंच होत असतात.

**गुरुराव** : ( गहिंवरून ) पण माझा मेलेला गजानन,—

**विद्याधर :** मेलेला नव्हे, तर विद्यापिठाच्या हलगर्जीपणानं मारलेला म्हणा ! सारं कांहीं आतां कायदेशीर बोलून, करायला हवं !

**गुरुराव :** ( आश्चर्य ) म्हणजे ? माझ्यासारख्या मास्तरानं कां आतां विद्यापिठावर फिर्याद करायची ?

**विद्याधर :** हो ! कारण, रेल्वेच्या अपघाताला जर सिग्नलर्स-गार्ड्सनां जबाबदार धरून त्यांना सक्तकैदेच्या शिक्षा दिल्या जातात; तर मुलांच्या मार्कांच्या बेरजा चुकविणाऱ्या विद्यापिठाच्या रजिस्ट्रार-कारकूनांना फांसी कां देऊं नये ? गुरुराव, गजाननाच्या मृत्यूची नुकसान भरपाई, विश्व-विद्यालयाकडून चोपून घ्या !

**सरस्वति :** मग तूं कर ना भावोजींचं हें एवढं काम ! अरे, पुरतं जेवण देखील हे घेत नाहींत !

**विद्याधर :** होय ! छे छे दीक्षित, असं दुःखीकष्टी तुम्ही मुळींच राहूं नका ! मी या साऱ्या प्रयत्नांत आहेच.

**सरस्वति :** प्रयत्नांत आहेस म्हणतोस नि सारखा इथं टिवल्या-बावल्या करीत वेळ घालवतोस !

**विद्याधर :** तर काय गांवांतला प्लेग पहात हिंडूं-? अग, आई ! तुला मी इथं चकाट्या पिटीत बसलेला वाटतों खरा; पण माझं या प्रकरणीं टपाल–कागदी घोडे काय थोडें नाचवून राहिलोंय ?

**गुरुराव :** वहिनी, विद्याधरपंतांना उगीच आतां कांहीं बोलूं नकोस.

**विद्याधर :** पण आईनं बोलून काय उपयोग ? तर एखादा कायदेपंडिताचा कायदा बोलायला हवा ! म्हणजे मग बघ मी युनिव्हर्सिटीवर कशी फिर्याद लावतो ती ? !

**गुरुराव :** अहो, पण द्रव्यबळाचं सहाय्य—

**विद्याधर :** तेंहि मी जमविलं आहे ! फुकटचं कां तो ज्युईस,–हिटलरचा शत्रू–ज्यू हा जवळ केलाय ?

**सरस्वति :** इतका कां तो पैसेवाला आहे ?

**विद्याधर :** पैसेवाला ? चांगला बँकर आहे. अग, आई ! तो कांहीं तत्त्वा-करितां म्हणून, सध्यां एका शिक्षणाधिकाऱ्याकडे नोकरी करतोय ! नाहींपेक्षां, जर तो एखाद्या संस्थानिकाकडे मोटार-शोफर म्हणून राहतां, तर त्यांचा जावई झाला असतां !

**सरस्वति :** तूं ही माझ्या समजूतीची चेष्टा तर करीत नाहींस ना ?

**विद्याधर :** छे, ग ! साऱ्याच गोष्टी क्रमाक्रमानं होणाऱ्या आहेत. काकांच्या मालकांची मुलगी द्वारका, ही सध्यां कुठं आहे ? कोणत्या परिस्थितींत ती आहे ?

**गुरुराव :** मग माझ्या शारदेचा वृत्तांत कांहीं कळला कां ? कुठंय ती ?

**विद्याधर :** वृतांत कळला ! कुठंय ती–तें कांहीं नक्की सांगतां येणार नाहीं ! पण गुरुराव, तुमची नाहीशीं केलेली शारदा, लवकरच मी तुम्हांला भेटवीन ! तुम्ही अगदीं निश्चिंत असा !

**गुरुराव :** ईश्वर तुम्हांला सहाय्य करो !

**विद्याधर :** त्यापेक्षां पोलीस मला प्रसन्न होवो,–हा आशिर्वाद द्या !

**सरस्वति :** विद्या, तूं हें उपरोधिक बोलणं अरे आतां सोडून दे. लहान कां आहेस ? चांगलं लगीन झालं असतं, तर एव्हांना चार दोन मुलं सहज झालीं असती !

**विद्याधर :** पण ही पदवीची वांझोटी लग्नबेडी, माझ्या गळयाला फांस म्हणून लागायची होती ना ? नाहींपेक्षां, मी—सकाळच्या मुंजीच्या दिवशीं, रात्रींच शुभ मंगल करून बसलों असतों.

**गुरुराव :** मग मात्र वहिनी, तुझ्या म्हणण्याप्रमाणं विद्याधरपंतांना खात्रीनं चार मुलं झाली असती खरी !

**विद्याधर :** केव्हांहि ! पण चालू शिक्षण आई-बापांनीं दिल्यामुळं कोरडी पदवीच हाती आली ! पानि कांहीं अजून, पदरांत पडत नाहीं.

**तर्कतीर्थ :** बायको वाटेवर कां पडली आहे ! ज्ञान, बायको, पैसा नि लौकिक हीं सर्व ज्याची त्यांनींच मिळवायला हवींत ! मागून ती मिळत नसतात !

**विद्याधर :** पण प्रयत्नांत तरी सारे असतातच ना? झालं तर! आई, तूं कांही काळजी करूं नकोस सारं तुझ्या नि दीक्षितांच्या मनाप्रमाणंच होईल!

**सरस्वति :** विद्या, तूं हें मनापासून मला आश्वासन देतोयस ना?

**विद्याधर :** तुझ्या पाया शपथ सारं कांहीं मी हें करणार आहे. दाशरथि रामाप्रमाणं वचन देऊं कां?

**सरस्वति :** नको! कळलं मला सारं तुझं अंतरंग.

**विद्याधर :** होय ना? तर मग लाग तूं आपल्या स्वैंपाक-पाण्याला! आणि गुरुराव, तुम्ही उद्यां आमच्या इथून आपल्या गांवीं परत जाण्यापेक्षां, उद्यांपासून इथंच गुरुचरित्राचं पारायण करीत बसा!

**सरस्वति :** हो! कौटुंबिक आपत्तीवर; पोथ्या-पुराणांचंच पारमार्थिक चिंतन हवं!

**गुरुराव :** बरं बरं! उद्यांपासूनच मी माझ्या गुरुचरित्राच्या सप्ताहाला सुरवात करतों.

**विद्याधर :** तसंच, अधुन मधून तुमच्या शिक्षण-खात्यांतल्या मौजा नि तुम्हां मास्तरांचे उपाशी पोटी हाल, हें हि मला सांगत चला कारण, साऱ्या चरित्रांच्या चरित्राचं तें एक मुख्य सार आहे सार!

**गुरुराव :** सार कसलं? अतिसार आहे झालं! ( उसासा टाकीत ) पण सांगेन तुम्हाला. ( दोघेहि जाऊं लागतात. )

**सरस्वति :** हें पहा विद्या, जरा मला या मळ्यांतला कढी-लिंबाचा पाला आणून दे पाहूं?

**विद्याधर :** कां? दीक्षित मास्तरांचें आवडतं पक्वान्न-उप्पीट करणार आहेस वाटतं?

**सरस्वति :** आधीं स्वैंपाक घरांत ये. मला तुझ्याशीं आणखी कांहीं बोलायचंय, लवकर ये हं! चला भावोजी. ( दोघे जातात. )

[ ते गेल्यावर उलट बाजूनं ज्युईस हा नवयुग मालेच्या पुस्तकांतून चारदोन पत्रें व एक फोटो घेऊन प्रवेशतो. ]

**ज्युईस :** मि. विद्याढर, ये बॅाब- गोला बघ!

**विद्याधर :** अर, हा तर आमच्या गुरुराव मास्तरांच्या शारदेचा फोटो ! आणि हीं पत्रं,- ( चाळीत ) आहेत खरें हें टाईम्स् - अॅटमिक्स् बॉम्स् ! पण तूं हें कुठून पैदा कलेस ?

[ तो त्याच्या तोंडावर हात ठेवून कानांत कांहीं कुजबजतो व हसतो ]

होय कां ? तर मग मी तुला आतां जेवढी पोपटपंची करावयाला लावीन, तेवढी बेंलाशक करीत जा !

[ **पडद्यांतः**—विद्ये ए विद्ये ]

थांब ! विद्येच्या नावानं आमचे पालक कां बरं ओरडूं लागले ! ( पाहून ) आणि सोबत पुन्हा मास्तरहि ! चल पाहूं !

[ विद्याधर व ज्युईस आंत जातात नंतर गणुकाका व गुरुराव दीक्षित मास्तर आंतून येतात ]

**गणुकाका :** ( त्रासून ) छे ! छे ! पहिला गाढवपणा माझा हा कीं, मी झक मारली नि मॅट्रिकपर्यंत गौरीला शिकवलं ! गौरी, ए गौरे ! कुठं गेलीय चुलींत नकळे ! अग ए विद्ये ऽ ऽ—

**विद्यागौरी :** ( स्काऊट वेषांत प्रवेश ) काय म्हणतां काका ? मी चुलींत गेले नसून, ही पहा तुमच्या समोरच उभी आहे !

**गणुकाका :** काय ग, हा विचित्र पोषाख करून तूं कुठं निघाली आहेस ?

**विद्यागौरी :** मी होय ? निघालें आहे मी बालोद्यानाचा पाठ घ्यायला !

**गणुकाका :** बालोद्यानाचा पाठ घ्यायला ? हें कसलं आणखी नवीन शिक्षण ?

**विद्यागौरी :** अहो, काका ! नवीन जमाना, नवीन शिक्षण ! सध्याचं युग ज्ञानाचं आहे म्हटलं !

**गणुकाका :** त मला शिकवूं नकोस ! मला साऱ्या युगांच ज्ञान माहीत आहे ! काय ग, अलिकडे तूं म्हणे फारशी अशी घरांत नसतेंस ? कारण मला सांगशील कां ?

**विद्यागौरी :** हो ! हात्तीच्या ! त्यांत काय आहे न सांगायला. हें पहा काका, मला किनई बी. ए. ची पदवी घ्यायचीय !

**गणुकाका :** अग ! पण ती वेणींतल्या आंकड्याप्रमाणं कां चार दोन पैशांत मिळणारी आहे ? बी. ए. व्हायला मूळचा बापच श्रीमंत असावा लागतो !

**विद्यागौरी :** पण गरिबींत राहूनहि बी. ए. होतां येतं काका ! मला दोन चार शिष्यवृत्त्या मिळणार आहेत.

**गणुकाका :** काय स्कॉलर-शिप्स् ? कोण तुला देणार बुवा !

**विद्यागौरी :** आमचे परोपकारी आचार्य सर ! त्यांनींच परवां चार दोन संस्थाकडे, माझ्याकरितां अर्जहि केले आहेत !

**गणुकाका :** केले असतील अर्ज ? पण त्या अगोदरचा माझा निकाल ऐक मला येथून तुला आतां पुढं शिकवायची इच्छा नाहीं.

**विद्यागौरी :** पण मी स्वावलंबी बनून, उच्च शिक्षण घेणार आहे. काका, कित्ती हो तुम्हीं भोळे अहांत ! अहो, आज सारं जग स्त्री-शिक्षणाकरितां कसं हापापलेलं आहे तें पहा ! शिकलेल्या स्त्रियानीं चारी खंडांत किती बौद्धिक-क्रांति केलेली आहे ती लक्षांत घ्या आणि मगच मला विरोध करा.

### सुगराई त्रिताल

**भारत आपुला व्हाया । अभिनव विलसे सदा या ॥ ध्रु ॥**
**क्रांति-किरण हा । ज्ञान-सुपथिं या ।**
**जगा शांति-धन द्या माया ॥ १ ॥**

[ तडक निघून जाते ]

**गणुकाका :** पहा, गुरु ! काय करावं आतां इथं बापानं ! मरावं ?

**गुरुराव :** अरे गणु ! मुलांना यावेळीं कांहीं बोलायचीहि सोय उरली नाहीं ! अरे, त्यांना कळत कां नाहीं ? सारं कांहीं पोरं समजून आहेत. ये बैस असा ( त्यांच्याजवळ बसतो.. तोंच )

[ **पडद्यांत :** " ए दाद्या, सोड मला. " ]

**विद्याधर :** ( विद्यागौरीला हात धरून पुढं आणीत ) थांब. मला काकांना विचारूं दे, कीं तुम्ही अशा या वेषांत माझ्या बहिणीला बाहेर कशी जाऊं देतां ?

**गणुकाका :** अरे ए विद्य , आपल्या उपवर बहिणीच्या अंगाशी वडील भावानं इतकी लगट करणं, बरं नव्हे ! चल, सोड तिचा हात !

**विद्याधर :** ( हात सोडून ) हा सोडला ! जाईना विद्या महारा घरीं !

**गणुकाका :** ( संतापून ) काय म्हणालास ? पुन्हा बोल पाहूं ?

**विद्यागौरी :** तो म्हणतो कीं, जाईना विद्या महारा घरीं ! पण काका, मी तुम्हाला शपथ घेऊन सांगतें कीं, जरी पुढं शिकायला लागले, तरी पण माझं कुलशील कधीहि बिघडूं देणार नाहीं, समजलं ! ( जातां जातां ) पुरुषासारखा पुरुष म्हणवितोस आणि काकांचं,–! शीः ! ऐदी कुठला ! ( जाते. )

**गणुकाका :** घे ! ही तुझी,–भावाची–आपल्या बहिणी जवळ किंमत !

**विद्याधर :** आणि वडिलांचा मानहि मुलीजवळ काय थोडा आहे ?

**गणुकाका :** ( संतापून ) अरे, तो चालू स्त्री-शिक्षणामुळं जळला ! पेटला !!

**विद्याधर :** तरी पण, आजचं हें चालूं पोशाखी स्त्री-शिक्षण पाहायला, आपले आगरकर हवे होते, नाहीं काका ? ( हसतो )

**गणुकाका :** ( चिडून ) गप्प बैस मूर्खा ! कशाला तूं टिळक-आगरकरांचीं नावं घेतोस विद्या ? त्यांनीं हेच शिक्षण घेऊन, जनतेंत लोकजागृति केली ना ?

**विद्याधर :** नाहीं, काका ! टिळक-आगरकरांच्या वेळचं शिक्षण, युनिव्हर्सिटीनं सध्यां बंद केलंय !

**गणुकाका :** कां-कां ? कां रे बंद केलंय ?

**विद्याधर :** कारण, टिळक-आगरकरासारखे, सारेच विद्यार्थी उद्यां झाले तर ? निष्कारण, सरकारला त्रासच कीं नाहीं ? आणि म्हणून तर दरवर्षी हा युनिव्हार्सिटीचा परिक्षा हंगाम, लक्षावधि कारकुनांची पैदास उत्पन्न करूं लागलाय ! सबब, त्याला विद्यापीठ म्हणावं कीं परिक्षा पीठ समजावं ?

**गणुकाका :** विद्या, फाजील शहाणपणानं फार बोलूं नकोस ! चालू शिक्षणाचे अर्थानर्थ तूं कां मला आतां समजावून सांगणार आहेस ?

**विद्याधर :** होय ! कारण, तुम्ही बी. ए. थोडेंच अहांत ?

**गणुकाका :** होय म्हणतोस, पुन्हां निर्लज्जासारखा ! गाढव नाहीं तर ! कित्येक चांगली चांगलीं हुशार पोरं, आजला मामलेदार-प्रांतसाहेब होऊन बसला आहेत ! अरे, त्यांनीं वार-मधुकरी मागून आपला विद्याभ्यास पुरा केला रे विद्या !

**विद्याधर :** मग मलाहि काका तुम्ही 'ॐ भवति' करायला लावायचं होतं कीं ? झालों असतों मीहि एखादा सेवाचिकिर्षू कोडतांतला तरणाबांड मुन्सफ-मामलेदार !

**ज्युईस :** ( प्रवेश करून ) काका, काकू विचारटे कीं, उप्पीट खायाला अंडर येटे कां बाहेर बसटे ?

**गणुकाका :** जा तिला म्हणावं इकडेच काय तें घेऊन ये ! तूं खाणार आहेस ना विद्या ? [ ज्युईस आंत जातो. ]

**विद्याधर :** हो !

**गणुकाका :** तर मग बैस इथंच ( गुरुराव जवळ दोघे बसतात. )

**गुरुराव :** हें पहा गणू ! मला राहून राहून नवल वाटतंय कीं, या चालू शिक्षणानं स्त्री-पुरुषांचं निभावणार कसं ? संसारसुख, धर्म-संस्कृति नि जातपात हेंच जर चालू शिक्षणपद्धतींनं नामशेष होणार असेल, तर असं शिक्षण मुलांना तरी आई-बापांनीं द्यायचं कसं ?

**विद्याधर :** देऊं नका ! इंग्रज सरकार कांहीं त्याबद्दल हिंदी जनतेपुढं थोडाच सत्याग्रह करणार आहे ! आई, मामाला बोलावना ?

[ ज्युईस नवयुगमालेचं पुस्तक घेऊन, व सरस्वति उप्पीटाच्या चार बशा घेऊन प्रवेशते. ]

**सरस्वति :** ( सर्वांपुढं बशा ठेवून ) तुम्ही करा सुरवात. मी पाणी आणते. ( आंत जाते. )

**ज्युईस :** ( उप्पीट खातां खातां ) मोठ्या-मोठ्या शिक रे अ आइई—

**विद्याधर :** ए ज्यू ! अरे कविता करणाऱ्यांनीं मात्रागमन केलं तें केलं ! पण तूं कां आतां 'शी' करीत, खातांना सारा घाण करून राहिलायेस ?

**ज्युईस :** अरे बाबा ! ये टुमची मऱ्हाट बोली भारी डिफिकल्ट हाय ! साला, पोपटपंचीनं हामी शिकायला बगटे, टों बिगिनिंगलाच "मोठ्या शी करीरे,–म्हनूनश्यान कुत्र्यावानी भुंकावा लागटे ! काई हा साला बुक हाय कां कुक हाय ?

**विद्याधर :** तें तुला इतक्यांतच नाहीं कळणार ! अगोदर उप्पीट खा !

**गुरुराव :** तें मी स्वानुभावानं आतां स्वच्छच बोलून टाकूं कां? हीं बुक म्हणजे मुलांना वात्रट बनविणारी असून, वडीलधाऱ्या मंडळींचा अनादर करणारी आहेत! मराठी भाषेचा मुडदा पाडणारी आहेत! थोडक्यांत, मुलांना भावि आयुष्यांत 'बोंबल फकिरे' बनविणारी आहेत!

**विद्याधर :** आणि मास्तर. आपलीं जुनीं क्रमिक पुस्तकं हो?!

**गुरुराव :** कशाला त्या आंता जुन्या क्रमिक पुस्तकांचीं नांवं घेतां? जशीं शाळेंतलीं क्रमिक पुस्तकं, तशी आपली पिढी! जुन्या क्रमिक पुस्तकांतून, ईश्वर विषयक सामान्य भाग म्हणून निराळा,-सृष्टिज्ञान विषयक म्हणून वेगळा, पदार्थ विज्ञानात्मक अलग! झालं तर, भूगोल-इतिहासात्मक,-वनस्पतिशास्त्र संशोधनात्मक,-सुंदर कवितात्मक,—

**गणुकाका :** अरे, ॰ आपल्या वेळच्या पुस्तकांची गोष्टच निराळी! सुंदर पाठांतर हा त्या क्रमिक पुस्तकांचा पाया आहे.

**विद्याधर :** आणि चालू क्रमिक पुस्तकांचा पाया,-राया पैसा हा आहे.

**ज्युईस :** हां! पन ते कुनाला बाबा! टर असली समडी रद्दी बुकं जो लिविल टेला!

**गुरुराव :** बरोबर! पुस्तक लावणाऱ्यांना फायदा! अभ्यास करणाऱ्यांना त्याचं काय होय? उलट. या पुस्तकामुळं मराठी भाषा मुलांची बिघडूं लागलीय! व्याकरणानं तर मागंच राम म्हटला! मुसंबींचं अनेकवचन "मुसंब्या" म्हणून देतात!

**विद्याधर :** पण पालक क्रमिक पुस्तकं म्हणून, शेवटीं ही रद्दी विकत घेतातच ना? आणि ती ही,-आजचीं उद्यां नाहीं—उद्यांचीं परवां नाहीं! सारखी वर्षाव-र्षाला पुस्तकं शाळाखातें बदलतंय! मुलांचे पालक खर्चानं मरताहेत; तर मुलं वेडे-टोणपीं बनून सुशिक्षित होताहेत!

**गुरुराव :** अशुध्द लेखन नि गचाळ अक्षर हाच चालू शिक्षणाचा आदर्श झालाय! त्यांत पुन्हा जातवार नोकऱ्यांचं उभं वेडं पीक! या पीकानं तर बरं कां गणू! माझं डोकंच कामांतून जात चाललंय! अरे उच्चवर्णीय मुलांना, सध्यां महारा-मांगापासून शिकावं लागतयं!

**गणुकाका :** अरे होय रे! पण त्यामुळं होतयं काय, तर मुलं आपल्या पालकांना मास्तरपेक्षांहि गाढव ठरवूं लागलीं आहेत! परवां, सहज दिन्याला पाह्यला म्हणून शाळेंत गेलों. त्याचा मांग मास्तर त्याला, "नव एक नव, नव दुनं आटरा"–हा अशुद्ध पाठ देत होता वर्गांत! तेव्हां, मी "नऊ म्हणायला सांगितलं, तर सगळा मुलांचा वर्ग मला म्हणाला, आमच्या मास्तरनीं नवच" म्हणायला सांगितलंय! तुम्ही मास्तरापेक्षां, शहाणे थोडेच अहांत?

**विद्याधर :** म्हणजेच पालक गाढव आहेत! कारण, मुलांची शिक्षण-पद्धति त्यांच्या शरीरा इतकीच रोडावली असली, म्हणून कांहीं मुलांची मनोमय श्रद्धा नाहींशीं झाली नाहीं!

**ज्युईस :** बराबर बोलटेस टूं! ए पोरां–पोरींचा वर्सांचा मेडिकल–रिपोर्ट लईशा चांगला नाय! संमद्यास्नां पायोरिया झालाया! लई आपापशांट, किसिंग करून सोडटं.

**गुरुराव :** तात्पर्य काय? तर विद्यार्जनाच्या नांवाखालीं हा सगळ्या जातींचा एकंकार चालला असून, माणूस माणूसकीला विचारीनासा झालाय! हाताखालच्या मास्तरांना चुकूनहि बोलायची सोय नाहीं! मुलांना मारायचं नाहीं! आणि वरिष्ठ–वरचा असला, तर त्याचा मूर्खपणाहि शहाणपणांतच शिकवावा लागतो!

**गणुकाका :** अरे पण तुम्ही हेड्–मास्तर असून, नुसते बोलतांच कां? चांगली संघटना करून, एक दिवस साऱ्या हिंदुस्थानांतल्या शाळा, मुलांना न शिकवितां बंद ठेवा! राहूं द्या कीं जागेवर शाळेच्या इमारती, वेळापत्रकं नि घंटा!

**गुरुराव :** अरे, गणू! संपाचं हत्त्यार, शाळा-खात्यावर कधींच चालणार नाहीं! कारण, माझ्या राजिनाम्याबरोबर, सरकारी हुकूमनामाहि पुढें आहे! दरमहाचा साधा आंकडा १५ वा २० रु. चा. पण तोहि प्राथमिक शिक्षकांना वेळेवर मिळेल तर शपथ!

**विद्याधर:** एवढंच ना? हात्तीच्या! १५–२० रु. चा आंकडा मास्तरांना न कां दिसे ना; पण अजून परार्धापासून शून्यापर्यन्तचं सारं संख्याशास्त्र तुम्हां मास्तर मंडळींच्या तोंडांत शाळाखात्यानं बोलायला ठेवलंय-अहो, हा काय थोडा लाभ-!

९२, ९५, ९९, ९९९! खिशांत मास्तराच्या नसेना कां दिडकी! पण मुलांना गणित घालतांना तर तो संख्येला फुगवीत राहतो!

**गुरुराव :** हो! नाहींपेक्षां, आंकड्यावर जर नियंत्रण उद्यां सरकारकडून मास्तर मंडळीवर आलं, तर बिचाऱ्याला १५–२० रु. चा पगारी आंकडाच तेवढा पाठ करून वर्गांत शिकवावा लागेल! एकदां काय झालं, बरं कां रे ए गणू! आपली शारदा, सध्यां जी पळवलीय ना!–ती होती आठ नऊ वर्षांची! मी वर्गांत घातला होता एक तोंडी हिशोब. एक तेल शेराला ·।।।≥।। आणे, तर १ खंडी १८ मण ३ पासऱ्या ४ शेर २ छटाकाला काय?

**गणुकाका :** इतक्यांत, शारदा तेलाचं भांड घेऊन, फोडणीला तेल नाहीं, म्हणून तुला शाळेंत कळवायला आली असेल!

**गुरुराव :** बरोबर ओळखलंस! सध्यां आम्हां प्राथमिक शिक्षकांचा हा असा लाजिरवाणा संसार झालाय! आमचं दैन्य नाहींसं व्हावं, म्हणून सरकारनं 'करमणूकीवर कर' लादला. दारूबन्दींतला 'फायदा,'–हाहि आम्हां प्राथमिक शिक्षकांना मिळणार होता,—

**विद्याधर :** पण तो स्कीम नि योजना आखतां आखतांच खर्च झाला! आणि प्राथमिक शिक्षक मात्र आज अर्धपोटी –उपाशीं राहिला!

**गुरुराव :** अहो, तो तसाच उपाशी राहून शेवटपर्यंत मरणारा आहे! ना त्याला कोणी शास्ता, ना कोणी पुसतां! इंग्रजी मास्तरांना, वर्गांत तासावारीनं तरी सौख्य आहे; पण आम्हा प्राथमिक शिक्षकांना, सक्त मजूरीचे गुन्हेगार कैदीहि सुखी दिसतात!

**विद्याधर :** होय ना? तर मग संप करून, तो यशस्वी करा! नोकऱ्या सोडा! शाळा बंद ठेवा! हळहळता कां? पगार वेळेवर नाहींत, भीक कसली मागतां? तुम्ही मास्तर लोकच आधीं महामूर्ख अहांत!

**गणुकाका :** तूंच तेवढं हें गुरुला बोलायचं राहिलं होतं,-!

**गुरुराव :** बोलूं दे. आम्हाला महामूर्ख म्हणू दे! पण प्रारंभीचा "श्रीगणेशा" –तर आमच्या कडूनच अजून घेतात ना?

**विद्याधर :** या अभिमानांतच प्राथमिक शिक्षक हा मेलाय! त्यांच्यांतच जर पाणी असतं, तर आज ही अशी प्राथमिक शिक्षणाची ओरडच होती कां?

**गुरुराव :** ऊं: एकार्थी खरंय तुझं म्हणणं,–! पण—

**विद्याधर :** एकार्थी कां, चांगलं ? बव्हर्थी आहे ! अहो, प्राथमिक शिक्षणच असं तकलादी व्हायला लागलं, तर मग पुढचं उच्च शिक्षण, हें तुच्च होणारच !

**ज्युईस :** खरा बोलटे विद्याडर टूं ! ये समडा एज्यूकेशन सेलफिश लोकांनीं बिगरवूनश्यान टाकला ! साला नोट म्हणून संमड्या पोरीन्नी, ये प्रोफेसर्स लव्ह-लेटर्स लिवूं लागले !

**सरस्वति :** ( हातांत पाण्याचा तांब्या व एक पत्र घेऊन प्रवेश ) पहा, पहा –हें प्रोफेसरांनीं गौरीला लिहिलेलं पत्र !

[ ती गणुकाकाच्या हातांत पत्र देते. तो वाचतो. ]

**गणुकाका :** तुला वाचायचंय कां रे विद्या ! प्रोफेसर, गौरीला फितवून राहिलाय !

**विद्याधर :** म्हणजे परवां कॉलेजमध्यें दोन मुलींनीं धर्मांतर केलं, तसं कीं काय ?

**गणुकाका :** छे, रे ! तिनं बी. ए. होण्याचा घाट घातलाय !

**विद्याधर :** चांगलंय काका ! गौरीनं बी. ए. व्हावं, या मताचा मी आहेच !

**सरस्वति :** पण ती धर्मार्थ शिक्षण घ्यायचं म्हणत्यें !

**विद्याधर :** बरोबर म्हणत्यें ! उद्यां ती धर्मार्थ नवरा करूनहि शिकेल.

**गणुकाका :** ( वैतागून ) काय, शिकेल काय ? बी. ए. ! कशाला हवंय इतकं शिक्षण तिला !

**विद्याधर :** तिला म्हणजे कुणाला ? गौरीला कीं, स्त्रियांना. ?

**सरस्वति :** बरं, स्त्रियांनां समज ! पण मी तुम्हां सर्वांना आधीं असं विचारतें कीं, " बायकांना शिक्षण कां द्यायचं ते अगोदर सर्वांनीं मिळवून ठरवा,–म्हणजे मग कसं द्यायचं तें पाहूं ? "

**ज्यूईस :** बराबर काकू ! संमडा बायका शिकूनश्यान हामा पुरुषाशीं कॉम्पिटेशन करायला बगटे ! साला मोटार ड्राईव्हिंगबी करूनश्यान हामा शोफर लोकांना बेकार बनविटे !

**गुरुराव :** म्हणजे ? इतक्या कां बायका पुढं जाऊं लागल्या ! मी समजत होतों कीं, त्या नुसत्याच ' बाई शिकली ' म्हणून सायकलीवर बसूं लागल्या !

**गणुकाका :** छे ! छे ! अरे, गुरु त्या आतां विमानांतून देखील उडायला लागल्या !

**ज्युईस :** हां, बराबर काका ! आन् म्हणूनश्यान टर ट्रे आमा पुरुषांना सांगटे कीं,–" गेला टुमी उडत ! हामी चालले हवा खाट ! "

**विद्याधर :** मग त्यांत कुठं बिघडलं ! हवेवर उडण्याचा पुरुषांनाच तेवढा अधिकार हवा आणि बायकांना तो नको, असं म्हणून आतां कसं भागेल ?

**सरस्वति :** पण असं करतांना स्त्री-पुरुषांच्या शारिरीक रचनेचा नि निसर्ग मनोविकारांचा विचार नको कां करायला ? स्त्री–शिक्षणाची दिशा ही बद्लायलाच हवीं !

**विद्याधर :** म्हणजे काय-? चालू स्त्री-शिक्षण हें वाईट कां आहे ? पोरी शिकताहेत, नटताहेत, मुरडताहेत, घरं सोडताहेत, धर्मांतर करताहेत; फार काय, पण शिकतां शिकतां कॉलेजमध्यें बाळंतिणीसुद्धां होताहेत,— !

**गणुकाका :** ( सरस्वतीस ) चल ! याचं फिरलंय डोकं ! पण मला लौकिक व्यवहार, घराण्याची अब्रू, सारं कांहीं पाह्यला हवं ! चल, कुठंय ती कार्टी इकडंच कुठंतरी गेली आहे नाहीं–कां-? चल रे चल गुरु–( ते दोघे जाऊं लागतात. )

**ज्युईस :** काका, हामीबी तुमच्या संगं येटे !

**विद्याधर :** हं, जा तुम्ही सारे नि करा काय तें !

**गणुकाका :** अरे जातों–जातोंच ! पहा तर खरा मी काय करतोंय तें ! चल ग चल दाखीव पोरीला–! ( विद्याधराखेरीज सर्व जातात )

**विद्याधर :** चालू शिक्षणामुळं आम्हां पुरुषांचं दिवाळं निघालंय, तर स्त्री-शिक्षणाचं वाटोळं होत चाललंय ! प्राथमिक शिक्षक पोटाच्या विवंचनेंत; तर दुय्यम इंग्रजी शिक्षक, आपल्या शिक्षण-संस्थाच्या धाकांत. पाश्चात्य-विद्या-वारुणीच्या पेयानं शिक्षणांध बनलेला प्रोफेसर वर्ग, हा गुंडगिरींतूनच युनिव्हर्सिटीच्या सिंडिकेटमध्यें प्रवेशतोय आणि–" सा विद्या या विमुक्तये–" या सूत्रापासून देवी शारदेची फारकत घेतोंय ! काय चालू शिक्षण चाललंय पहा,–!

[ शुद्ध–कल्याण–तिताल- ]

**आशा पंडितांच्या अज्ञाना तुलना ना।**
**निज ऱ्हास खास ॥ धृ० ॥**
**विडंबन सद्‌‌ाचार–शील–गण।**
**द्रव्य याचना, क्षुधा वंचना।**
**नीति–लांछना ज्ञानालयास ॥ १ ॥**

[ विद्याधर आंत गेल्यावर उलट बाजूनं प्रो. आचार्य व कु. विद्यागौरी ही उभयतां बॉय-स्कॉउट-ड्रेसमध्यें प्रवेश करितात. ]

**प्रो. आचार्य :** काय पण सुरेख तूं या वेषांत मला दिसत्येस! जसा कांहीं यू. टी. सी मधला मुलगाच!

**विद्यागौरी :** आणि म्हणून तर मला आतां कोणीहि ओळखणार नाहीं.

**प्रो आचार्य :** प्रत्यक्ष तुझा बाप-भाऊ जरी तुला शोधत इथं आली, तरी त्यानांहिं तूं विद्यागौरी आहेस हें ओळखतां येणार नाहीं! चल, वाटल्यास आपण,

**विद्यागौरी :** नको, सर! मला आतां हा वेष उतरून आपल्या निघण्याच्या तयारींत राह्यला पाहिजे! शिवाय, आई-वडिलांच्या हांका,–

[ **आंतून** :–विद्ये अग विद्ये ] त्या पहा ऐकूं येऊं लागल्या! जाते मी. दिवेलावणीची वेळ होत आली.

**प्रो. आचार्य :** ( घड्याळाकडं पहात ) ओ–अजून तसं निघायला आपल्याला तास दीड तास अवधि आहे. तोंपर्यंत चल, आपण त्या बांधावर जरा विश्रान्ति घेत पडूं!

**विद्यागौरी :** कांहीं नको! सर, मला आतां इथून जाऊं द्या.

**प्रो. आचार्य :** पण मला एक महत्त्वाचा तुला किंडरगार्टनचा पाठ द्यायचा होतां! मि. फ्रोबेलची ही 'बालोद्यान–शिक्षण–पद्धति' कशी छान आहे नाहीं! लहान मुलां–मुलींबरोबर हंसत–खिदळत उड्या मारून, मास्तरनं कसं पोर बनावं-याचं जणुकाय मी तुझ्याबरोबर प्रात्यक्षिक घेत आहे!

**विद्यागौरी :** पण इतक्या वेळ आपण हरणाप्रमाणं चपळ बनलों,—

**प्रो. आचार्य :** नाहीं तसं,—माकडाप्रमाणं एकमेकावर चिडलों,—कुष्याप्रमाणं भुंकलो,—बेडकाप्रमाणं ओरडलों, एक दोनदां तर सश्याप्रमाणं पळून, आपण आपली ससेहोलपटहि करून घेतली! पण खरं सांगू कां, गौरी! अजून माझ्या मनाचं समाधानच होत नाहीं!

**विद्यागौरी :** तर मग तुम्हांला आतां घोड्याप्रमाणं किंकाळायचंय कां गाढव होऊन दुगाण्या झाडायच्या आहेत?

**प्रो. आचार्य :** साऱ्या कांहीं लहान मुलांच्या बालोद्यान- पद्धति मला तुझ्या बरोबर गिरवायच्या आहेत! असं वाटतं कीं, आपण दोघांनीं मिळून स्वीमिंग-ड्रेस करावेत आणि बेडकाप्रमाणं ओरडत या विहिरीच्या पाण्यावर तरंगत पोहावं!

**विद्यागौरी :** छे! पण ती कूपमंडूकवृत्ति होईल! सर, आज आतां आपण आरंभिलेला हा बालोद्यानाचा पाठ एवढ्यावरच संपवूं!

[ भावगीत. ]

**आनंदी आनंद हा। दे मानसा॥**
**मंद पहा सौगंधिक हा। दरवळुनि वायु धुंद।**
**रान-पांखरांना भान। गाती नेति आलोचन॥ ध्रु०॥**
**कोकिळा गाऊनि। साळुंकी नाचोनि।**
**जिवासि प्राण द्याया। माराया वाघासि।**
**नर-केसरी। हरिणी भुले मृग-जळासि।**
**गाई वासरांना पान्हा ओपिला॥ १॥**
**अलंकार पुष्प भार। वृक्ष-छाया घ्या निवारा।**
**निबंधुनि माया-बंध। भरारुनि रानोंराना॥**
**आकाशीं चंडोल। मोर तो भूतली।**
**जीवा प्राणियांना। महिला राणी निसर्ग विलास राजा॥ २॥**

[ **आंतून** :—विद्ये, अग ए गौरी ]

तें पहा, कुणी तरी आई-वडिल इकडे मला शोधतच येताहेत! सर, जातें मी!

[ गडबडीनें आंत जाते. ]

**प्रो. आचार्य :** जातेंस ? पण ठरल्यावेळीं मी इथंच आसपास हजर आहे, बरं कां ?

**तर्कतीर्थ :** ( हातांत मुंबईचा लोकमान्य असलेला प्रवेश. ) "जात्येंस ?" नि मी इथंच आसपास हजर आहे ?" हा काय प्रकार आहे इथं ? ( आचार्यांस पाहून ) कोण प्रोफेसर कां ! कां हो, आमच्या या मळ्यांत तुम्ही कसें ?

**प्रो. आचार्य :** ( पाहून ) कोण ? कुठं तरी चेहरा पाहिलेला वाटतोंय !

**तर्कतीर्थ :** अहो, मी तो आपला तर्कतीर्थ चिवडेशास्त्री ! परवां, तुमची आमची,—

**प्रो. आचार्य :** हो ! पुण्यास गांठ पडली होती खरी !

**तर्कतीर्थ :** आणि तुम्ही मला आपला जांवई करून, लग्न-गांठ बांधणार होतात ! शिवाय, माझी संस्कृतचीं पुस्तकं,—

**प्रो. आचार्य :** अरे, खरंच ! तीं [illegible]र करायचीं आहेत, नाहीं कां ?

**तर्कतीर्थ :** वा महाराज ! आपला पत्ता सांपडतां सांपडेना !

**प्रो. आचार्य :** त्याचं असं झालं कीं, तुम्ही पुण्याला यायला नि धडाकून प्लेगनं शाळा बंद व्हायला एकच गांठ पडली !

**तर्कतीर्थ :** मग आपली झोंपडी इथंच कुठं जवळपास आहे कीं काय ? असल्यास चला म्हणतों ! तुमची लग्नाची मुलगी तरी बघून घेऊं या !

**प्रो. आचार्य :** हो, पण मी प्लेगमुळं बिऱ्हाड मुंबईस नेलंय !

**तर्कतीर्थ :** मग तुम्ही इथं कसें ?

**प्रो आचार्य :** मी सध्यां इथं यू. ओ. टी. सी. करितां आलोंय ! कँपच उतरलाय इथं.

**तर्कतीर्थ :** ( मिश्किलपणें ) कँपांत मुली आहेत वटतं ?

**प्रो. आचार्य :** मुलींप्रमाणं तुम्हाला मुलं दिसलीं असतील !

**तर्कतीर्थ :** होय, बुवा ! तुमच्या या पुण्यांत अलिकडं बघावं, तर सोळा-सतरा वर्षांची तरुण मुलं, आपल्या समवयस्क मुलींना पाहून मुरकतांना दिसतात; तर मुली, मुलांवर गुरकतांना दिसतात—?

**प्रो. आचार्य :** सांगतों काय हो,-शिंचे नुसते बायले,—अगदीं स्त्रैण—रसिक ! बरं पण, हातांत वर्तमानपत्र कसलंय ? कांहीं लढाईचीं ताजी बातमी —?

**तर्कतीर्थ :** मुंबईचा " लोकमान्य,"—नवीन पंचांग काढतोंय !

**प्रो. आचार्य :** काढूं द्या; पण जादा काय म्हणतोय तो !

**तर्कतीर्थ :** ( दाखवीत ) हें मथळेच पहा ना ? वाचा ! " कॉलेजमध्यें दोन ब्राह्मण तरुणींचं धर्मांतर "—" युनिव्हर्सिटीच्या सिंडिकेटमध्यें खळबळ !—"

**प्रो. आचार्य :** ( बेपर्वाईनें ) ऊं ! तात्पुरतीच ! सध्यां धर्मांतर होत नाहीं कुठं ?

**तर्कतीर्थ :** आणि काय हो ? युनिव्हर्सिटीकडून आतांशा पेपर्स कां बरं वरचेवर फुटताहेत ?

**प्रो. आचार्य :** खऱ्या विद्या-दानाचं पुण्य, सर्वांनाच लाभावं म्हणून !

**तर्कतीर्थ :** पण अशानं पोरी बाळी देखील युनिव्हर्सिटीवर फिर्यादी करूं लागल्या ना ?

**प्रो. आचार्य :** पण दाद लागणार आहे कां ? फिर्याद काय ? कुणी-कुणावर करावी !

**तर्कतीर्थ :** अहो, पण अशानं विश्व-विद्यालयाला डाग नाहीं कां लागत ?

**प्रो. आचार्य :** लागतो ना ? आणि असे आजपर्यंत युनिव्हर्सिटीवर थोडे कां शिंतोडे उडविलेत-उडविणारांनी ? म्हणून तिनं आपलं स्वत्व सोडावं ! हें पहा तर्कतीर्थ ! पूर्वीचें भांडारकर—राजवाडे प्रभृतींचं युनिव्हर्सिटीमधील सत्ययुग, सध्यां आम्ही धंदेवाईक प्रोफेसर मंडळींनीं साफ बदलून टाकलंय !

**तर्कतीर्थ :** अगदीं उघड-उघड बोलताहांत हो !

**प्रो.आचार्य :** मी उघड स्पष्टवक्ताच प्रोफेसर आहे ! भांडारकरांचा मुलगा बी. ए. च्या परिक्षेला बसल्याबरोबर त्यांनीं युनिव्हर्सिटीला कळविलं कीं, यंदा माझा मुलगा बी. ए. ला बसला आहे; सबब, मला परिक्षेला नेमूं नका !

**तर्कतीर्थ :** अरे वा ! छान ! असली निस्पृह सत्यनिष्ठ माणसं त्याकाळीं युनिव्हर्सिटीमध्यें होती तर ?

**प्रो. आचार्य :** अहो, म्हणून तर आम्हांला चांगलं शिक्षण मिळालं! सध्यां पाहतांच अहांत ना! चार दोन ग्रेस मार्कांकरितां नि मुलं मुली पास करून घेण्याकरितां आम्हांला काय काय चक्रव्यूह रचावे लागतात ते? थोडक्यांत युनिव्हर्सिटी ही जागेवरच आहे! आणि तिचा अभ्यासक्रमहि लोकमतानुवर्तीच चाललाय!

**तर्कतीर्थ :** तात्पर्य, युनिव्हर्सिटीमध्यें काम करणारी मंडळी,–

**प्रो. आचार्य :** ( मध्येंच ) आमच्याप्रमाणं तूर्तास संधि साधू बनून, आपापला यथेच्छ स्वार्थ साधित आहेत! आणि म्हणूनच या खऱ्या गोष्टी सध्यां वर्तमानपत्रांतून उघड होत आहेत! आतां लोकांनीच मनावर घेऊन युनिव्हर्सिटीवर महात्मा गांधीजींचा बहिष्कार पुकारला, तरच ती खऱ्या विद्या दानाच्या मार्गावर येईल! नाहीपेक्षां असंच जर चाललं, तर युनिव्हर्सिटीची म्युनिसिपालिटी करणं आजला आम्हाला अगदीं शक्य आहे!

[ **पडद्यांत :** बँडचा आवाज ]

अरे, परेड संपली वाटतं! येतो हं मी [ तडक निघून जातो ]

[ उलट बाजूनं गणुकाका, ज्युईस व गुरुराव दीक्षित मास्तर, गौरीच्या शोधांत प्रवेशतात. ]

**गणुकाका :** जवळपास लष्करी परेड चाललीय वाटतं?

**तर्कतीर्थ :** नाहीं! लष्करी शिस्तींतून पोरींना कसं पळवावं,–याचं हें आचार्य-कृत एक प्रात्यक्षिक चाललंय–!

**गणुकाका :** काय म्हणतां–? गौरीला तुम्ही पाह्यलं—?

**ज्युईस :** हामी काका टो प्रोफेसर पलालेला पाह्यला!

**गुरुराव :** अरे पण–पोर त्याच्या बरोबर पाह्यली कां?

**तर्कतीर्थ :** कोण? आपली विद्यागौरी ना? हो! ती होती गौरी-शंकराच्या वेषांत!

**गणुकाका :** आणि तुम्ही पडलांत असें नंदिकेश्वराच्या अवतारांत!

**तर्कतीर्थ :** आपण माझे शालक अहांत! तेव्हां, बोलाल तें सारं ऐकून घेतलंच पाहिजे! पण स्पष्ट बोलतों; माफ करा! गौरी, आपल्या हातची गेली!

**विद्याधर** : ( प्रवेश करून ) मामांची बत्तीशीं पुरेपूर वठली !

**गुरुराव** : विद्याधरपंत, मी तर तुमचं हें बोलणं ऐकून अगदींच आश्चर्यचकित झालाय ! माझा पायगुण तर हा तुम्हांला बाधलेला नाहीं ना ? अहो–माझी मुलगी पळवून नेली, ती विधवा तरी होती. पण तुमची बहिण तर चांगली कुमारिका—

**विद्याधर** : ( मध्येंच ) गुरुराव ! कुमारिका काय आन विधवा काय ? चालू धडाडून पेटलेल्या या शिक्षण-सत्रांत, अशा या कोंवळ्या पोरींच्या आहुत्या, ह्या पडायच्याच ! विश्व-विद्यालयाला किंवा शिक्षणाधिकाऱ्यांना, हें पाह्यला सध्यां सवड आहे कुठं ? जों तों आपल्याच विद्या-मदांत ! आणि हा विद्या-मद कोणता ? तर या चालू दिखाऊ बेगडी शिक्षणाचा कीं, ज्यांत संपूर्ण स्वावलंबनशक्ति मेलेली आहे, विचारशक्ति धुंदकारलीय आणि शारिरीक जोपासनेची शीलासकट होळी चालेली आहे ! काका, तुम्हां-आम्हांना आज गौरी मेली ! गौरी भडकली ! !

**ज्युईस**: ओ यू मि. चिवडेमामा ! अरे, टुमी व्या प्रोफेसराला हॉल्ट कां नाय करूनश्यान टेवला !

**तर्कतीर्थ** : प्रोफेसराला हॉल्ट करायला सध्यां तो एकटा कां आहे ? नाहीं बरं ! चांगला सशस्त्र सैन्यासह आलाय ! लेकाचा, जांबोरी भरवीत पोरी पळविणारा तो शिक्षकासूर ! सनदशीर शैक्षणिक गुंड तो !

**गणुकाका** : ( संतापून ) म्हणून काय तो आमच्या शिकल्या-सवरल्या पोरींना फुस लावीत पळविणार कीं काय ?

**तर्कतीर्थ** : शिकलेल्या पोरींना मुळींच पळवावं लागत नाहीं; तर त्या आपण होऊनच पळांत रजिस्टर करतात !

**गुरुराव** : साफ खोटं ! शिकलेल्या स्त्रियांना, शाळाधिकारीच पळवून नेतात ! हें माझ्या म्हाताऱ्या शिक्षकाचे बोल स्वानुभवाचें खरें आहेत !

**विद्याधर** : भ्रम आहे, गुरुराव तुमचा ! याबाबत तुम्ही जों जों शाळाधिकाऱ्यांना दोष देत रहाल, तों तों तुमच्या पोरीबाळींसंबंधीं जगाला जास्त-जास्तच संशय येत जातो नि शेवटीं दुर्दैवानं तो खराहि ठरतो !

**गणुकाका** : बरोबर बोललास तूं विद्या ! आधीं आपलाच दाम खोटा असतो, म्हणून तर दुसऱ्याशीं झगडण्याचा बांका प्रसंग माणसावर येतों !

**गुरुराव :** पण माझी मुलगी सालस असून, तिला छक्के-पंजे कांहीं माहित नाहींत !

**विद्याधर :** हा सारा आपल्या आंधळ्या आत्मियतेचा आभास आहे ! खरं सत्यदर्शन व्हायला, मघांच्या पत्रासारख्या पर्वण्याच पाहव्या लागतात !

**गुरुराव :** नाहीं हो ! अहो, व्हिलेज पोस्ट-मास्तराचं कामदेखील मीच पाहातों ना ? रोजची डिलिव्हरी-बटवडा हा मजकडूनच होतो !

**विद्याधर :** पण प्रेमाची हँड डिलिव्हरी करायला तरुण मण्डळी ही पशु-पक्ष्यांनांहि आपल्या अंकित करीत असते, हें विसरूं नका ! आपण मास्तर आहांत आणि मला वाटतं, तुम्ही आजपर्यन्त नल-दमयंती आख्यान मुलांना पुष्कळ वेळां कधितरी शिकविलं असेल ?

**तर्कतीर्थ :** खरंच बुवा ! प्रेमी जोडप्यांनीं या कामीं गो-ब्राह्मणांचादेखील भलतांच उपयोग करून घेतलेला रुक्मिणी-हरणावरून दिसतो !

**ज्युईस :** अरे टे संमडा मागं झाला अशेल ! पण ह्यामचा ॲडमिनिस्ट्रेटिव्ह साब टो, मोटारच्या हॉर्नवरच संमज्या मास्टरणींना पलवटे ! टेना डोलाबी मारावा लागट नाय !

**विद्याधर :** बरोबर ! कारण, डोळे गेलेत—चष्म्यांत ! सध्यां कुणाच्याच डोळ्यात पाणी राहिलेलं नाहीं; म्हणून तर हे असले प्रकार, आत्तां राजरोस उघड्यावर चालतात ! वडिल मंडळींच्या डोळ्यांत जसा धाक राहिलेला नाहीं, तसाच प्रेमी जोडप्यांच्या डोळ्यांत, शृंगारहि असलेला दिसत नाहीं !

**गणुकाका :** ( चिडून ) काय म्हणालास विद्या ? वडिलांच्या डोळ्यांत धाक राहिलेला नाहीं ? थांब ! आत्तांच्याआत्तां टांकोटांक असाच त्या जांबोरी कॅम्पवर जातो आणि त्या प्रोफेश्वराची चांगलीच खटर-पूजा करून, पोरीचं लग्न हातोंहात या मामाशींच उरकून टाकतों ! चांगली त्या शिक्षण-नंदीकेश्वराला वेसण घालतों पहा !

**ज्युईस :** चाला काका ! ए आमी टुमच्यापुढं हाय. ( दोघ जातात. )

**तर्कतीर्थ :** या नवीन आघाडीवर सर्वांनींच जायला हवं ! चल, विद्याधर-इथं शिस्तीची माघार घेऊन चालणार नाहीं ! अरे, चल लवकर ! आहेस कुठं—? ( जाती. )

**विद्याधर :** शिक्षणामुळं मस्त झालेल्या या धुंद वातावरणांत! गुरुराव, ज्या विद्येला विनयाची जोड राहिली नाहीं, त्या विद्येची किंमत कवडी मोलच नाहीं, कां– ?

**गुरुराव :** विद्याधरपन्त ी आल्यापासून तुमच्या बोलण्यांतल्या प्रत्येक शब्दाचा विचार करून [illegible]य कीं, तुमची शैक्षणिक दृष्टी कोणत्या प्रकारची होत चाललीय–?

**विद्याधर :** आणि गुरुराव! तुम्ही आल्यापासून, नव्हे तुमच्या एकुलत्या एक मुला–मुलीची कर्मकाहणी ऐकल्यापासून मी तर याबाबत फारच भयंकर विचारी बनत चाललोंय! असं वाटतं कीं,-दारूच्या गुत्त्यावर जसं राष्ट्रैक्य-हित-बुद्धीनं पिकेटिंग करावं लागतं; तसंच तें आपण शाळा-कॉलेजिसवर करीत लवकर मरून जावं!

**गुरुराव :** शिव! शिव! काय हें भयंकर बोलता विद्याधरपन्त! तुम्हाला मार्कण्डेयाचं दीर्घायुष्य लाभो!

**विद्याधर :** कशाला? पदवीच्या कोरड्या अहंकारी ताठ्यांतच मी एक बी. ए. आहे, म्हणून मूर्खपणानं जगांत जगायलाच ना? गुरुराव, तुमच्या मुलानं जी आत्महत्त्या केली, ती तुमच्या दृष्टीनं अत्यंत अनुचितच आहे; पण आम्हां सुशिक्षित बेकारांच्या दृष्टीनं पाह्यलं, तर "सुटला बिचारा गजानन–" म्हणून आम्हाला समाधानाचा सुस्कारा सोडावासा वाटतोंय!

**गुरुराव :** खरंच कां विद्याधरपन्त, सध्यां इंग्रजी शिक्षणाची इतकी दुर्दशा उडालेली आहे? लोकमान्य टिळकांनीं म्हटल्याप्रमाणं, खरंच कां आज 'युनिव्हर्सिटीचा-हमालखाना" झालेलाय–?

**विद्याधर :** तो तसा हमालखाना जरी झाला असतां, तरी एक वेळ तें परवडलं गेलं असतं! पण सध्यां पहाल, तर निव्वळ युनिव्हर्सिटीचा "जनानखाना" झालेला आहे! खोटं वाटत असल्यास, आज कोणत्याहि घरांतली इंग्रजी शिक्षण घेत असलेली भाऊ-बहिणीची जोडी, नीट डोळेभरून पहा! नि बघा तें त्यांचं तारुण्य नि तेज!!

**गुरुराव :** होय बुवा! कुठंहि गेलं तरी आपला ठरलेला विद्यार्थी विद्यार्थिनींचा सांचा! केवळ वास्तुपाठांतले जिवंत हाडांचे सांपळे!

**विद्याधर :** आणि विद्वत्तेचे नमुने म्हणून जर कां तुम्ही त्यांच्या डोक्याला हात घालू पहाल, तर शाहाळी-नरोटींच हातीं येण्याचा संभव फार !

**गुरुराव :** हो ! हो ! हातीं यायलाच कशाला पाहिजेत म्हणा ! प्रत्यक्ष दिसताहेतच कीं ? आणि ही पिढी म्हणे आपल्या देशाचं पारतंत्र्य घालविणार ? !

**विद्याधर :** तो प्रश्न अगदीं निकराचा आहे ! पण आजच्या गरजेचा मुख्य प्रश्न हा आहे कीं, चालू शिक्षण हें स्वावलंबी कसं करतां येईल ? विद्यार्थ्यांचा मानसिक नि शारिरीक ऱ्हास कां नि कसा होतोय ? आणि विद्यार्जनाच्या नैतिक पुण्यप्रद वातावरणांत काय काय हिडिस नि राक्षसी प्रकार चालले आहेत ?—ह्या तीन प्रश्नांचीं उत्तरं, विश्व-विद्यालयाच्या वतीनं जर एखाद्या महाभाग समाज-शास्त्रज्ञान सोडविलीं, तर तीं आज समाजाला हवीं आहेत !

**गुरुराव :** तर मग महात्मा गांधीजींच्या आज्ञेप्रमाणं, शाळा-कॉलेजचा बहिष्कार, समाज हा यशस्वी कां करीत नाही ?

**विद्याधर :** इथंच तर इंग्रजी शिक्षणाची मोहिनी, मायावी वेषांत थैमान घालतेय ! प्रथम खर्डेघाशी करितां, मुलकी अपलेली सात इयत्तेची पुरी परीक्षा, पण आजला ती बी ए ; एम्. ए ; च्या डिग्र्या घेऊनहि, लोकांना दुर्मिळ अशी होऊन बसलीय ! आणि यांतच तर चालू शिक्षणाची "नालायकी" शाबीत होऊन राहिलीय ! ऐहिक-सौख्याच्या अभ्युदयासाठीं, जशा "आय. सी. एस." च्या परिक्षा, साता-समुद्रापलिकडे गेल्या आहेत, तशाच मानसिक शान्तीला, तत्त्वज्ञान शिकविणाऱ्या "पी एचडी." च्या पदव्या,-कीं ज्या आमच्या बापजाद्यानं इथं कंदमुळांचं सेवन करीत उघड्या अंगानं झाडाखालीं मिळविल्या, त्या-आज आम्हांला विलायती-विलासी वातावरणांत मिळवाव्या लागताहेत ! सारांश शिकल्या-सवरलेल्या लोकांची ही डोळस-दिशाभूल म्हणजेच आजच्या विद्येची ही चाललेली आबाळ होय !

**गुरुराव :** बरं, महात्माजींच्या वर्धा-शिक्षण योजनेबद्दल—!

**विद्याधर :** मत देतां येणार नाहीं ! कारण ती "वर्धा-शिक्षण" योजना नसून, "अर्धा-शिक्षण" योजना झालीय ! आणि दुसरं असं कीं, शैक्षणिक उत्क्रांतीत आतां महात्माजीच काय; पण प्रत्यक्ष परमात्माजी जरी हातांत छडी

घेऊन या गुलाम भरत भूमींत अवतरले, तरी तेहि निमुटपणें आहे हेंच आजचं शिक्षण गिरवूं लागतील! नि बेकार बनून फुकट मरतील! पण स्वातंत्र्याशिवाय चालू शिक्षणांत सुधारणा म्हणून आतां कोणहि करूं शकणार नाहीं! इतका हा आज शैक्षणिक-संन्निपात-ज्वर, सर्वांना सारखाच हाडींमांसी झालेलाय! नि त्यांतच आपल्यासकट सर्वस्वाचा नाश होणारय!

**गुरुराव** : पण आपण आपलं स्वतंत्र " महाराष्ट्र-विद्या-पीठ " काढून, जर—

**विद्याधर** : कांहीं करणार असाल, तर तें पारतंत्र्यांत न काढलेलंच बरं! गुरुराव, शिक्षण कोणतंहि जरी घेतलं, तरीपण " पैसे कसे मिळवावे ? " याबद्दल मात्र जगांतलं कोणतंच " महाविद्यालय " मार्ग दाखवूं शकत नाहीं! बरं पण मला वाटतं कीं, आपण त्या पलिकडल्या जांबोरी कॅम्पपर्यन्त जाऊन येऊं या! काका गेले आहेत म्हणून अंमळ धास्ती वाटते. जाऊं या सहज बोलत बोलत.

**गुरुराव** : चला! पण काय हो, हें जांबोरी प्रकरण म्हणजे बॉय स्कॉऊटची जी चळवळ म्हणतात—

**विद्याधर** : ( मध्येंच ) होय! तीच ही वळवळ आहे. यांतूनच आपण गुलाम लोक शिस्तीचे धडे गिरवीत आपापल्या मुलांबाळांना लष्करी शिक्षण देणार अहोंत! समुद्र-मंथनांतून देव दानवांनीं जशी बरीवाईट चौदा रत्नं काढली, तशीच या चालू कु-विद्या शिक्षण प्रसार उथळ सागरांतून डॉ. मुंजे भोंसल्यांचं मिलिटरी शिक्षण, सतीचं वाण घेत सक्तीनें म्हणे बाहेर पडणार आहे! तेव्हां, याही ज्ञान वापीचं दर्शन तुम्ही आम्ही जाऊन घेऊं या.

**गुरुराव** : जरूर! जरूर! असे ज्ञानाचे जलाशय, तडाग, कूप वगैरे सारे हे पाहिले पाहिजेतच!

**विद्याधर** : आणि तें पुन्हां आपण अगदीं महामूर्ख, गाढव अहोंत, या भावनेंनंच बरं कां ?

**गुरुराव** : हो! कारण, हें सारं पाहून शहाणाच जिथं गाढव ठरतोंय—

**विद्याधर** : पण गाढव मात्र गाढा विद्वान होतोंय! निबंधमालाकारांनीं कुठल्याशा निबंधांत म्हटलंय कीं, पूर्वीच्या काळीं महाविद्वान् सांपडणं मोठं कठीण होत,—

**गुरुराव :** ( मध्येंच ) आजच्याकाळीं महाशंख सांपडणं कठिण झालंय !

**विद्याधर :** अहो म्हणून तर शिक्षणाच्या नांवानं समाजाचा शंख चाललाय ! पहा तर एकेक विद्वान

[ हिन्दोल-तिताल. ]

**बहु-गुणीं जों तों ज्ञान मदांधा ॥**
**गणिना कोण, स्वजना मान ॥**
**असूया वचना ज्यांना ॥ धृ० ॥**
**मनिं अभिमान ढंग नव नाना ॥**
**अवनत भाव सुजाणा ॥**
**सोंग सजत सकला सुजन हो ॥**
**बघुं या बुध ते प्राणि-मात्र-! ॥ १ ॥**

[ ते दोघे जातात. नंतर तर्कतीर्थ प्रवेशतो. ]

**तर्कतीर्थ :** चला ! मला जांवई करून घेण्याचा विचार आमच्या शालकांचा आतांच कळला-फक्त आतां आक्काचा अभिप्राय समजून घ्यायचाय; तो एकदां कळला म्हणजे लग्नाचा मुहुर्त पाह्यला कांहीं हरकत दिसत नाहीं ! अक्का, अग ए सरू अक्का,—

**सरस्वति :** ( प्रवेश करून ) काय म्हणतोयस—? पण काय रे, तूं त्यांच्याबरोबर गौरीला पाह्यला गेला होतास ना ?

**तर्कतीर्थ :** हो ! पण फिरलों झालं परत. अक्का, मी आज फारच दमलोंय.

**सरस्वति :** कशानं रे-?

**तर्कतीर्थ :** अग तुझ्या मुलांबरोबर मी दुपारपासून एकसारखा सुरपारंब्या खेळत होतों ! काय सांगूं अक्का, त्या दिन्यानं असा कांहीं मला झाडावरून सूर मारला कीं, तो मघाशीं माझ्या नरड्यांतच जाऊन अडकला.

**सरस्वति :** छान ! म्हणजे विद्यासारखा तूंहि आपल्या भाच्याबरोबर पोरकटपणा करूं लागलास म्हणायचा ? बरं, मुलं कुठं आहेत—?

**तर्कतीर्थ :** तीं आतां त्या माळ्याच्या मुलाबरोबर हुतुतू खेळून राह्यली आहेत ! बरं पण अक्का, तुला मी एक नाजूक प्रश्न विचारूं का—?

**सरस्वति :** मला सध्यां कांहीं विचारूं नकोस !

**तर्कतीर्थ :** कां ग—? तुझी प्रकृति तर बिघडली नाहीं ना—?

**सरस्वति :** संसारांत विकृति व्हायला लागली, कीं प्रकृति बिघडणारच ! आधींच आमचा ओढगस्त संसार ! त्यांत हें सध्यां चालूं शिक्षणाचं पिशाच्च घरांत शिरलेलं—! जीव कसा नकोसा झालाय मला ! तो प्लेग माझ्याच वाट्याला कां येत नाहीं, मी म्हणत्यें !

**तर्कतीर्थ :** छे ! छे ! असं बोलूं नकोस अक्का ! अग तुम्हीं आर्य स्त्रिया म्हणजे मूर्तिमंत त्यागाच्या माउल्या अहांत ! तुम्ही आपल्या कुटुंबाकरितां मेलंच पाहिजे, हा धर्माचा दंडक आहे !

**सरस्वति :** पण कर्माचा पोरखेळ संसारांत सुरू झाला, म्हणजे आम्हां स्त्रियांना मरणच बरं वाटतं !

[ विश्वनाथ प्रवेश करून आईला बिलगीत हूडपणा करतो. ]

**विश्वनाथ :** आई-आई- ! पिग=म्हणजे डुक्कर, डॉग=कुत्रा, डॅाकी=गाढव.

**सरस्वति :** थांब ! दिवे-लावणीच्या वेळीं असं कांहीं घाणेरडं घोकूं नये. तर दिव्याला नमस्कार करून, देवाची प्रार्थना करावी. जा. बोलाव साऱ्यांना देवघरांत ! पुरें झालं खेळणं !

[ तो मिठी सोडून, पुन्हा तेंच म्हणत जातो. ]

**तर्कतीर्थ :** छे ! छे ! अक्का, काय ही शिक्षणाची अधोगति झालीय पहा ! "हरि ॐ नत्वां सरस्वतिदेवि वाग्वार्थ—असं म्हणून पूर्वीच्या ऋषि-मुनिप्रणित गुरुकुलांत तिन्हीं-त्रिकाळ हा जयघोष चालावयाचा ! तिथं आज सकाळ-संध्या-काळ पीग=डुक्कर, डॅाकी=गाढव, डॉग=कुत्रा-हें मुलांना घोकायची पाळी आलीय !

**सरस्वति :** हं, सारं जगच जिथं बदलंय,—तिथं अभ्यासाची तऱ्हा ही बदलायचीच !

**तर्कतीर्थ :** अग, तऱ्हा—बदलायची म्हणजे किती ? पूर्वी गुरुकुलांत मुलांचं ब्रह्मचर्य सक्तीनं पहात असत ! पशू-पक्ष्यांनांहि अतिप्रसंग तिथं करतां येत नसे.

इंग्रजींत गुरुकुलाला 'रसिडेन्शियल् स्कूल्स्' म्हणतात, बरं कां अक्का! तेव्हां त्यांत मंत्रनाद, वेदघोष, भूपाळ्या, काकडआरत्या, शेज आरत्या,—

**सरस्वति :** सारं कांहीं धार्मिक विधिनं होत असेल! पण आजला साराच मनु बदललाय-! तेव्हां, आहें हें असंच चालू राहणार!

**तर्कतीर्थ :** पण त्यामुळं मुलां-मुलींचं नैतिक-शील सुटत चाललंय ना? शाळेंत जातांना सिनेमा नटींचीं अर्धनग्न चित्रं दिसणं,-कामुक विचारांची मासिकं वाचणं,-कॉलेज-क्लबांतून कांदे-टॉमेटोच्या कोशिंबिरी खाणं, सिगारेटस् फुंकणं, दारू पिणं,-छे-छे! कहर चाललाय अक्का-!

**सरस्वति :** सारेच तसं करीत नसतील म्हणा!

**तर्कतीर्थ :** सारेच तसं करतात! कॉलेज-कुमारिकांच्या बाबतींत तर तूं बोलूंच नकोस! म्हणून म्हणतों कीं, विद्येला कॉलेज-शिक्षण देतांच कामा नये! तिचं तूं माझ्याबरोबर लग्न करून दे! आज ती मॅट्रिक आहे! उद्यां मी तिला काव्यतीर्थाच्या परिक्षेला बसवून वेदान्ततीर्थ करतों! हं, मग कसं काय वाटतं तुला हें माझं स्थळ?

**सरस्वति :** मला वाटतं, तूं हें तिच्या कानावर घातलंस तर बरं होईल!

**तर्कतीर्थ :** नाहीं. घालण्या अगोदरच, त्यांनीं हे मान्य केलयं! बरं, साटा-लोट्याचा हा शरीरसंबंध येत नसल्यानं माझी मागणी मान्य करायला कांहींच अडचण नाहीं! कारण, कसा झालों तरी आज मी पंडितमन्य आहे! अंगीं गाढ नि जाडजूड विद्वता असून, कलकत्ता-संस्कृतचा मी काव्यतीर्थ आहे! माझी संस्कृत बुकं शाळेंत आहेत! शिवाय, उरलं-सुरलं साहित्य भांडार या माझ्या औरस-चौरस मस्तकांत खुलं आहे! एवंच, मी म्हणजे जगांतल्या साऱ्या ज्ञानांचं एक प्रदर्शन आहे.

**सरस्वति :** तूं हें सारं उघड बोलतोयस याबद्दल मला कांहींच म्हणायचं नाहीं! पण, विद्येला तूं अगोदर पसंत पडला पाहिजेस ना?

**तर्कतीर्थ :** ऊंः गौरीला मी केव्हांच पंसत पडलोंय! कालच ती आणि मी पेटी काढून गात होतों! अक्का, तुला माहीत नाहीं? मी जसा सुसंस्कृतज्ञ आहे ना? तसाच संगीत रसज्ञ, मर्मज्ञ, तर्कज्ञ वगैरे वगैरे "ज्ञ" आहे "ढ"

नाहीं! पुष्कळ शाळांतून संगीत मास्तराची नोकरी करीत करीत, मी कुलीन विद्यार्थिनींना नटींचा अधिकार मिळवून दिलेलाय! "शालेय-भेसूर-संगीत-पद्धति"-मीच जागोजाग ओरडून सुरू केलेलीय अक्का!

**सरस्वति :** हें पहा! तुझं हें म्हणणं सारं जरी खरं असलं, तरी पण माझ्या हातीं यातलं कांहीं नाहीं! ते जाणें नि ती गौरी जाणें!

**तर्कतीर्थ :** पण आपल्या भावाचा वंश वृद्धिंगत व्हावा, असं नाहीं कां तुला वाटत? मला एखादा भाऊ असतां, तर मी आज एखाद्या शंकराचार्यांच्या गादीवर "श्री" म्हणून विराजमान झालों असतों! पण मुलाकरतां माझं तें "आचार्यपद" आज नडून राहिलंय! नाहीपेक्षां, एव्हांना मी दिवस उजेडी-मशाली पेटवून, गांवोंगांव पाद्यपूजा घेत मिरवायचा अक्का.

**सरस्वति :** खरं कां?

**तर्कतीर्थ :** होय तर? म्हणून म्हणतों कीं, गौरीनं माझ्याशीं एकदां लग्न लावलं कीं, वैदिक सूक्तं रचणाऱ्या गार्गी मैत्रीयिणी प्रमाणं मी तिला संसार सुलभा बनवून मंडितांकिता अंकित करतों! हो! नाहीं तरी तुमच्याजवळ हुंड्याला पुरेसे पैसे कुठं आहेत? तेव्हां, जमवा झालं आपापसांतच! हं, मग काय म्हणत्येस?

**सरस्वति :** अरे पण तुझ्या नि तिच्या वयांतलं अंतर नको कां पाह्यला?

**तर्कतीर्थ :** त्यांत तें काय पाह्यचंय? अगदीं, कैलासनाथ-गौरीहराप्रमाणं आमचा हा जोडा जीर्ण-शीर्ण थोडाच दिसणार आहे? निम्या शिम्या वयाचे नवरा-बायको हें नेहमीं कुठंहि असतातच! शिवाय, दिनकरनं एका ठिकाणीं म्हटलेलंय कीं, "तुटकी वहाण फुटकी सहाण, जांवई लहान नसावा!" तेव्हां अक्का, एवढं हें तूंच मनावर घेऊन, मला एकदां तुला आक्काची-मामी म्हणून हक्कानं, हांक मारूं दे ना ग अक्का!

**सरस्वति :** (हंशावारी नेत) अगबाई, खरंच! तुझी तर अगदींच तिजवर घाई झालेली दिसत्येय! ईश्श! काय हें-? मामा-भाचीचं लग्न? भारीच बाबा तुझी ही अचाट कल्पना! हें पहा, चिंतू! तूं याबद्दल अगोदर गौरीलाच विचार! तिची जर संमति असली, (पहात) अगबाई, पण ती पहा! कसली तरी

तयारी करून, गौरीच इकडे येतेय ! थांब हं, मी तुळशीपुढं दिवा लावून आणते अगोदर ! ( आंत जाते. )

**तर्कतीर्थ** : येतेय ! आली ! आहा, गौरी इकडंच आली ? मी तिला तयार करून, गौरी-हराच्या पूजेला बोळकी घेऊन बसवितों !

[ मध्यांत उभा राहतों. गौरी प्रवासाच्या तयारीनं प्रवेश करते. तो तिला आडवितो. ]

अहाहा ! हें मत्प्राण-गौरेश्वरी विद्यादेवी विनया,—

**विद्यागौरी** : कोण, मामा ! कसला फाजीलपणा चाललाय-?

**तर्कतीर्थ** : कुमारिका निर्दोष दर्शना कन्यका खलु इंयम् ! " अविवाहित माणसानं, उपवर मुलीकडे पाहाण्यांत मुळींच पाप नाहीं, " असं नागानंदाचं वचन आहे. वासवदत्तेंत आधार आहे !

**विद्यागौरी** : पण मला आडवितां कां ?

**तर्कतीर्थ** : केवळ शरीरसंबंधा करीतां ! लग्नाकरितां ! " पुन्नाम् जायते त्राता असौ पुत्राः " ! निव्वळ मुलाकरितां !!

**विद्यागौरी** : ( हंसून ) कोण ? तुम्ही कां आतां माझ्याशीं लग्न करणार अहांत ? पण मला मुळीं लग्नंच करायचं नाही, तर प्रोफेसर आचार्यांबरोबर,—

**तर्कतीर्थ** : क्षण-काम-सखि बनून, तसंच राह्यचंय होय ? अगकार्टे, तूं त्या किरिस्तावासारख्या दिसणाऱ्या अवधूत प्रोफेसरावर अनुरक्त होऊन, कामासक्त झाली आहेस, होय ? मग बरोबरच ! तुला आतां कामा पुरतांहि हा मामा, नकोसा झाला असेल ! ( दरडावून ). पण हें पहा,-वर्तमानपत्री नाटक्या—

**विद्यागौरी** : ( संतापून ) हं खबरदार या संबंधीं कांहीं मला कुणी उणं-अधिक बोलाल तर-? माझी मी आतां-वयानं,-ज्ञानानं,-पूर्ण स्वतंत्र झालेली आहे ! दूर व्हा ! मला या घरांत मुळीं राह्यचंच नाहीं !

**सरस्वति** : ( दिवा हातीं घेऊन, तुळशी वृंदावनावर ठेवित ) मुळींच राह्यचं नाहीं ? तर मग कुठं जायचंय गौरी-? ( रागानं ) तूं अगोदर कुठं जायला निघाली आहेस, सांग पाहूं ?

**विद्यागौरी** : निघालेय मी मुंबईला !

**सरस्वति :** कुणाबरोबर नि कशाकरितां ?

**विद्यागौरी :** मला तिथं कॉलेजचं शिक्षण घ्यायचंय !

**तर्कतीर्थ :** पण बरोबर कोण ?

**विद्यागौरी :** माझे प्रोफेसर गुरुवर्य आचार्य !

**तर्कतीर्थ** (साश्चर्य) काय तो आचारी ! तो प्रोफेसर तुझ्याबरोबर नि मुंबईला ? साऱ्या मुलखाचा तो "लैंगिक-लिंगायत !" तो काय तुला "लैंगिक-ज्ञान देणार ? त्यापेक्षां, ए पोरी ! तूं माझी लग्न-प्रियतमा हो म्हणजे मी तुला प्रकाण्ड-पण्डिता-रमा करून सोडतो !

**विद्यागौरी :** माझं अडलंय खेटर, तुमच्या सारख्याशीं लग्न करायला ! मला मुळीं या जन्मीं लग्नच करायचं नाहीं, तर बी. ए.; एम्. ए.; व्हायचंय !

**तर्कतीर्थ :** पण तें असं प्रोफेसराजवळ राहून—?

**विद्यागौरी :** ( चिडून ) हो ! तो प्रश्न माझा आहे !

**सरस्वति :** बरं बाई ! तुझाच तो प्रश्न आहे हो ! पण त्यांना नि विद्याधराला तर इथं येऊं देशील ? कां तेंहि नाहीं ?

**विद्यागौरी :** मला कुणालाच भेटावसं वाटत नाहीं ! नि मी त्यांना कुणाला भेटणारहि नाहीं ! ( मनिबॅगमधून पत्र काढित ) हें एवढं काकांना पत्र दे म्हणजे झालं

**सरस्वति :** दे तें तुझी तूंच !

**विद्यागौरी :** अस्सं कां ? तर मग पडूं दे हें इथंच ( पत्र टाकतें ) आई आहेस कीं खाई आहेस ? ( पत्र तर्कतीर्थ उचलतों )

**सरस्वति :** बोल बाई ! तुला आतां जेवढें बोलतां येत असेल, तेवढं बोल हो ! तुम्हांला लहानाचं मोठं करतांना आईनं खाल्लेल्या खस्ता, आईच्या आंतड्यालाच त्या जाणवतात; म्हणूनच तें उदार नि थोर असं ठेवावं लागतं !

**" पुत्राचे सहस्र अपराध । माता काय मानी तयाचा खेद-? !!**

**विद्यागौरी :** ( वेडावून ) हं, म्हणे-"पुत्राचें सहस्र अपराध । माता काय मानी तयाचा खेद !"–सांगितलं होतं कुणी अगोदर तुला " माता " व्हायला ?

आपण कुणी स्वतः सांभाळायचं नाहीं आणि मग मुलांच्या नांवानं ओरडायचं!

**सरस्वति :** बरं बाई! फार उशिरा आम्हांला तूं हें सांगितलंस? एकूण काय, तर आई-बापांची अडचण तुम्हां शिकल्या–सवरलेल्या नि सुशिक्षित झालेल्या मुलींना व्हायला लागली, होय?! बरंय! देवाची मर्जी असल्यास तसंहि होईल?

**विद्यागौरी :** ( चवताळून ) उगीच "तसंही होईल"–म्हणून आतां अधिक वेळ जगूं नका! तर अगदीं हातोंहात,–शेजाऱ्याप्रमाणं हातांत हात देत तुम्ही आई-बापांनीं मरा! एक क्षणभर देखील जिवंत राहूं नका! तुमच्याच मुलांबाळांची तुम्हाला शपथ आहे.

**सरस्वति :** रात्रीचा दिवस नि दिवसाची रात्र करून, अनेक गंडांतरांतून तुम्हां मुलांना वाचविल्याबद्दल जर आईबापांच्या मृत्यूची गरजच असेल, तर हेंहि लाड आम्ही तुमचे पुरवूं बरं! विद्ये, आम्ही जरी मेलों, तरी पण आमच्या ठिकाणीं विद्याधर आहे. तो तुला, तूं कुठंहि जरी गेलीस तरी तो खेचून आणील समजलं?

**विद्यागौरी :** ( पुनः वेडावीत ) समजलं?

**तर्कतीर्थ :** ( संतापून ) अक्का, फारच पोरींची बाष्कळ बडबड वाढली! पहात्येस, काय? उडव दोन श्रीमुखांत! नाहीं तर मला सांग, मी हिला चांगली ठोकून सरळ करतों!

[ तो अतिप्रसंग करणार तोंच विद्यागौरी मामाच्या मुस्काडांत मारते. ]

**विद्यागौरी :** ( मामांच्या तोंडांत मारीत ) कुणाला रे माम्या, ठोकून सरळ करणार आहेस? अगोदर तुझं हें डोकं, एखाद्या तांबटाकडून चांगलं ठोकून घे! पीडा-मेली! ( प्रोफेसरास हांक मारून ) सर, —

**प्रो० आचार्य** ( हातांत पथारी घेतलेला प्रवेश ) बेटा, —

**विद्यागौरी :** घ्या ही बॅग नि मारा पाहूं अगोदर मोटारचं हँडल-

**तर्कतीर्थ** ( गाल चोळीत आंत जात ) बरं बरं! पाहून घेईन! ( जातो )

**प्रो. आचार्य :** ( बॅग हातात घेऊन ) चल, तुझी वळकटी मी ही केव्हांनांच गुंडाळलेलीय! फक्त बिछान्याचा छबिना मिरवीत न्यायचाय, तो आतां मुंबईच्या ग्रँड हॉटेलांतूनच! यस्, कम अलॉंग!

[ तिचा हात धरून, तिला नेऊं लागतो. ]

**सरस्वति :** ( दोघांना आडवी सामोरी होत ) आपण एवढे शिकले-सवरलेले विद्वान् प्रोफेसर म्हणवितां आणि तरण्या-ताठ्या पोरींना शिक्षणाच्या नांवाखालीं त्यांच्या आई-बापाच्या समक्ष घरांतून बाहेर काढून नेतां, हें तुम्हाला नि घेतलेल्या तुमच्या शिक्षणाला तरी बरं वाटतं कां ?

**प्रो. आचार्य :** काकू ! बरं नि वाईट हें चालू जमान्याला मुळींच मान्य नाहीं !

**सरस्वति :** कां बरं ? ज्ञानाच्या नांवाखालीं, सध्यां पशु-युग तर सुरू झालं नाहीं ना ?

**प्रो० आचार्य :** हो–शिक्षणासंबंधीं कांहीं जर विचाराल, तर आजचं इंग्रजी शिक्षण, हें नात्या-गोत्याचे लागेबांधे किंवा वडिल-धाकलेपणाचे ऋणानुबंध मुळींच पहाणारं नाहीं !

**सरस्वति :** म्हणजे ? इंग्रज राज्यकर्त्यांना संसार, अपत्य-प्रेम, माया-हीं नाहींत म्हणतां ? कीं आपण मला हें अनुभवानंच सांगतांहात ?

**प्रो. आचार्य :** होय ! स्वतः मुलां–मुलींच्याच उदाहरणावरून मी हें बोलतोंय !

**सरस्वति :** ऐक विद्ये ! यांचं वर्तन पाहून यांचीं मुलं-मुलीं सुद्धां यांच्याजवळ राहात नाहीं, असं दिसतं ! म्हणून म्हणत्यें कीं, तूं शहाणी असशील तर या प्रोफेसराबरोबर बाहेर पडूं नकोस !

**विद्यागौरी :** पण मी इंग्रजी शिकूनच, शहाणी व्हायला बाहेर पडत्येय.

**प्रो. आचार्य :** ध्या ऐका ! अहो, काकू ! इंग्रजी शिक्षणाचा मोह म्हणजे ती एक मादक सुरा आहे !

**सरस्वति :** नाहीं ! त्या शिक्षणांत वावरणारे तुम्ही प्रोफेसर म्हणजे निव्वळ असूर अहांत ! राक्षस अहांत ! ! विद्ये, देवासारखं आपलं सत्तेचं घर सोडून, तूं या " शिक्षण-समंधा " बरोबर जाऊं नकोस !

**विद्यागौरी :** पण मला कॉलेजचा कोर्स पुरा करायचाय ! मी नाहीं राहणार ! इथं !

**प्रो. आचार्य :** बरोबर! कारण, शाळा-कॉलेजचा प्रवेश, हें एक व्यसन आहे! विद्या-मदाचा मोह आहे!!

**सरस्वति :** ऐकलंस! तेव्हां, या व्यसनाच्या आहारीं तूं जाऊं नकोस! विद्ये, यांच्या बोलण्याचा भावार्थ नीट लक्षांत घे आणि घर सोडायचा आततायीपणा करूं नकोस!

**विद्यागौरी :** पण मला B. A.; पदवीधर व्हायचंय—!

**प्रो. आचार्य :** व्हायलाच हवं! कारण, पदव्यांचा हव्यास, हाही आजच्या तरुण–पिढीला जडलेला एक महारोग आहे!

**सरस्वति :** ( संतापून ) अरे, पण महारोग्या! लोकांच्या घरच्या अशा पोरीं–बाळी काढून कां, तुम्ही आपल्या पदव्यांचा महारोग वाढविणार अहांत? विद्ये, जायचं नाहीं घरांतून कुठं–? चल, सोड त्यांचा हात.

**विद्यागौरी :** नाहीं, मी जाणार! माझा प्राण घेतला तरी मी शिकायला जाणार.

**प्रो. आचार्य :** झालं! मग अशा स्थितींत आपण मला उगीचच वेड्यासारखं बोलून, कां बरं अडवितां–? !

**सरस्वति :** आईचं कर्तव्य म्हणून! माया वेडी म्हणून!!

**प्रो. आचार्य :** अहो, पण हें आतां असं उत्तरोत्तर अधिक वाढत्या प्रमाणांत सार्वत्रिक व्हायचंच!

**सरस्वति :** ( संतापांत ) व्हायचं असेल! पण ही सरस्वति देखल्या डोळां आपल्या मुलीला–विद्येला, केव्हांहि बरोबर नेऊं देणार नाहीं, समजलं?

**विद्यागौरी :** आणि मी तुझ्या डोळ्यांदेखतच, यांच्या बरोबर जाणार. चला हो सर्! आईचं काय ऐकतां? ती वेडी आहे!!

**प्रो. आचार्य :** तेव्हां, आईसाहेब! आपल्याला हें पाहतां आलं तर पाहावं, नाहींपेक्षां स्वस्थ मरून जावं, हे उत्तम! चल बेटा,–( तो तिला नेऊं लागतो. )

**सरस्वति :** ( आडवीत ) थांबा! अगोदर या विद्येच्या सरस्वतीचा, आईचा प्राण घ्या आणि मगच माझ्या या दुधखुळ्या पोरीला घरांतून बाहेर न्या! चिंतू, ए चिंतामणि,—

**तर्कतीर्थ :** ( प्रवेशून ) अक्का,—

**सरस्वति :** पाहतोस काय–? आडव यांना ! ( तो तसं करायला जातो. )

**प्रो. आचार्य :** ( तर्कतीर्थाला लाथेनें दूर करीत ) आय शॅल किक यू अनदर्!

**तर्कतीर्थ :** ( रडत ) अक्का, मला प्रोफेसरानं बुटाची लाथ मारली ! ( रडतो )

**सरस्वति :** अरे, विद्या-ए विद्या ! अहो कुणी तरी या हो इथं—

**विद्यागौरी :** चला सर् ? ( सरस्वतीस ) चल सरक ? दूर ? पहावत नसेल, तर त्या विहिरींत पडून जीव दे ! मर जा !!

[ प्रो० आचार्य, विद्यागौरीला विकट हास्य करून घेऊन जातो ]

**सरस्वति :** " विहिरींत पडून जीव दे !" म्हणजे तरी या मुलींच्या इंग्रजी शिक्षणाला आग लागेल कां ? चिंतू, त्यांना माझा नमस्कार सांगून, मुलांना-विद्याधरला अशीर्वाद सांग ! येतें मी !

**तर्कतीर्थ :** ( उठून पण कण्हत ) कुठं निघाली आहेस, तूं अक्का–!

**सरस्वति :** मुलीच्या सदिच्छेप्रमाणं स्वर्गांत,–त्या विहिरींत,—!

[ सरस्वति एखाद्या पिसाटाप्रमाणं आंत जाऊन विहिरींत उडी घेते. तर्कतीर्थ आरडा ओरड करीत, सगळ्यांना हांका मारीत सुटतो. ]

**तर्कतीर्थ :** अहो, काका ! अहो मास्तर, अरे विद्या ! अहो, कुणी तरी या हो या ! प्रोफेसरांनीं गौरीला पळविल्यामुळं ही पहा अक्कांनीं विहिरींत उडी घेतली ! धांवा हो धांवा ! अक्का बुडाली, तिला अगोदर वांचवा !

[ गणुकाका, ज्युईस व विद्याधर घाबरून प्रवेश करतात. ]

**विद्याधर :** ज्युईस, चल विहिरींत उडी टाकायला–! आईला अगोदर वाचविलीच पाहिजे ! ( जातो. )

**ज्युईस :** चल चल बाबा ! आमी काकूंना कंडीबी मरूं डेणार नाय ! (जातो.)

**गणुकाका :** ( मटकन् खाली बसत ) परमेश्वरा ! मुलांना चालू शिक्षण देऊन जर तूं कौटुंबिक आपत्तीच-या अशा घरोंघर निर्माण करणार असशील, तर आजच्या ह्या सुशिक्षित पार्जा जगांत कुटुंब-वत्सल म्हणून वावरणं,–हें अत्यंत महापातकांतलं पातकच ठरणार आहे ! आणि गुन्हेगाराप्रमाणं आई-बापांनीं जीव

देणं, एवढंच आज अबुदार कुटुंबांच्या हातीं राहिलंय! शिव हरे! शिव हरे! देवा, काय रे तूं हा आज प्रसंग दाखविलास?

**गुरुराव :** ( डोळ्याला पदर लावून प्रवेश ) गणू–

**गणुकाका :** काय झालं दीक्षित—?

**गुरुराव :** काय सांगूं कपाळ!

**गणुकाका :** ( साश्चर्य भीत ) म्हणजे?!

**गुरुराव :** ( रडत ) सरस्वति गेली,– बुडाली वाटतं!

**गणुकाका :** काय? शेवटीं, ती मेलीच! अरेरे! झाला! संपला सारा आमचा संसार–ग्रंथ! मुलांच्या विद्येकरितां वाड वडिलार्जित असलेल्या लक्ष्मीचा मी आपण होऊन आपल्या हातानं त्याग केला; तर माझ्या सांसारिक सरस्वतीला आपल्या मुलांच्या विद्याभ्यासापायीं जीव द्यावासा वाटला! ( डोक्यावर विलक्षण वेडाचा परिणाम होतो. ) आऽआऽऽ दीक्षित! तूं नि मी आतां खरें समदुःखी झालों! द्यः द्यः द्यः—

**गुरुराव :** ( आवरित ) गणू! गणू! शांत रहा! वेड्यासारखा डोक्यावर परिणाम करून घेऊं नकोस! अरे, वेड्या! संसारांत माणसांना हेंच दुःख फार आहे बरं —!

**गणुकाका :** नको तो संसार! नको त्या नोकऱ्या! नको तें मुलांचं चालू घातुक शिक्षण! ( मोठ्यानं ओरडत ) आणि नको–नको ती कृतघ्न मुलंहि नको! ( वेडातिरेकांत ) हं, म्हणूं या आपण,—

**भज गोविन्दं, भज गोविन्दं, भज गोविन्दं मूढमति ॥**
**निरय गतीची गूढगति, इंग्रजी शिक्षण वेड किती ॥**

[ वरील चरण म्हणत गणुकाका वेडे होऊन नाचूं लागतात. साहजिकच त्याचा मानसिक परिणाम गुरुराव दीक्षित मास्तरावर कांहींसा होऊन, तो फक्त वरील पहिला चरणच गणुकाकाबरोबर गुणगुणत म्हणत राहतो.]



# ★ ३ ★

[ ग्रँड् हॉटेलमधील एक ब्लॉक, आधुनिक सामान–सुमानानीं सुसज्ज-म्हणजे टेबल, खुर्च्या, मच्छरदाणीचा पलंग, सेल्फ, एक दोन आरसे वगैरे व्यवस्थित असलेले. वेळ संध्याकाळचा ७॥ चा सुमार, मात्र तो शुक्लपक्षांतला असल्यानें चंद्र-किरणांचा प्रकाश झोत हा आंत आलेला स्पष्टपणें दिसतो ! वेटरबॉयच्या वेषांत मि. ज्युईस हा साफसुफी करीत असून, तोंडानं खालील कविता गुणगुणतोय—]

**ज्युईस :** स्पीक जन्टली टू दि एजेड् वन्; ग्रीव्ह नॉट दि केअर वोर्न हार्ट; दि कोर्स ऑफ् लाईफ इज् निअरली रन् लेट सच इन पीस डिपार्ट; ये हामचा नाटकांटला पार्ट कवा एकडाचा खलास होयेल, ये व्यारीमंडी हामी इठं वेटर बॉयच्या काम करटे ! साला, चार डिसांटच हामी ये ग्रँड् हॉटेलमंडी बेजार झाला ! टवा आज काईबी होवो, पन येचा संमडा ट्रंका–बॅगा आन् बाड बिस्टरा ( खिश्यांतून चाव्याचा झुबका काढीत ) ये चोर-चाव्यांनी खोलुन-श्यान काय पुरावा-बिरावा मिलाला टर आटांच पाहूं या---

[ बॅग उघडतो; तोंच एक दागिन्याचा डबा त्याला दिसतो. तो काढून घेतो. ]

चला ! हामी आटा एकटा टे प्रोफेसरला ऑर्थर जेलमंडी नेऊनश्यान् बसविटे !

[ बेल वाजते. तो तें सारे पुन्हा पूर्ववत् जसेंच्या तसेंच व्यवस्थित सामान ठेवतो व दार उघडतो. विद्याधर व तर्कतीर्थ प्रवेश करतात. ]

मि. विद्याढर ! साला ए नाटक कवा खलास होयेल, येचा हामी राटडिन वाट बगटे !

**विद्याधर :** कां रे बुवा ! इतक्यांतच कंटाळलास वाटतं ?

**ज्युईस :** अरे हां बाबा ! हा आमची रजाबी आटां दहा बारा डिस राह्यली हाय.

**तर्कतीर्थ :** पण खायची-प्यायची चंगळ आहे ना इथं ?

**ज्युईस :** अरे, चंगळ कसली चिवडे मामा विचारटे! ये ह्योटेल मंडली संमडे ट्रव्हलर्स जसा काय इंडियांत सायमन कमिशन् आल्यावानीं वागटे! साला, एकेकाची ट्रीट्मेंट करायची टर मोठी आफट वाटते! ( हसत ) आपला मोटार ड्रॅयव्हिंग कुणाच्या बापाला ऐकट नाय! बरं पन, टुला इतका वेल–वखुट कां म्हनू झाला-येयाला–?

**विद्याधर :** अरे, आम्ही सगळे गेलों होतों माटुंग्याला—

**तर्कतीर्थ :** आपल्या "श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमांत"!

**ज्युईस :** संग काका–गुरुराव मास्टर बी—?

**विद्याधर :** होय! आई, काका, गुरुराव मास्तर वगैरे सारे आम्ही तिथंच या वेळपर्यंत होतो. अरे तुला माहित नाहीं, आपल्या गुरुराव दीक्षित मास्तरांची मुलगी सांपडली!

**ज्युईस :** सांपरली-? बरा झाला!

**तर्कतीर्थ :** फार चांगलं झालं! नाहींतर मला नि विद्याधराला वेडं व्हायची पाळी आली होती!

**ज्युईस :** हरकट नाय! पांचसाट आण्यामंडीं ठाणा लई जवल हाय टुमाला!

**तर्कतीर्थ :** पण तिथवर पोहोंचवायची जबाबदारी तुझ्यावरच आहे, हें विसरूं नकोस, ज्युईस! कारण, तूं जसा कम्युनिस्ट आहेस, तसाच मीहि सोशॅलिस्ट आहे. अर्थात् उत्पन्नाचीं सारीं भांडवलीं साधनं, जशीं सार्वजनिक मालकीचीं आपल्याला व्हायला हवींत, तशींच वेड्याचीं इस्पितळं,–हीं देखील तुमच्या–आमच्या मालकीचींच झालीं पाहिजे!

**विद्याधर :** शिवाय, माझ्याकरितां कां होईना; पण तूं रजेंतल्या सुट्टींत, या मुंबईत असा हॉटेल बॉय बनून वेड्यासारखं काम करतोयसच!

**ज्युईस :** हां! पण हामच्या ये वेड्यानं, टुमच्या टे शहान्या प्रोफेशराला माटू आमी आटां ऑर्थर, नाय टर डोंगरी जेलमंडी खरी फोरायला पाठवेल!

**तर्कतीर्थ :** काय-काय? मि. ज्युईस, तो तुरुंगांत खडी फोडणार-? तर मग, त्याला आपण येरवडा जेलची रिमांड मागून घेऊं या! इथं डोंगरीवर नको!

कारण, त्यांत आमचे लोकमान्य टिळक नि आगरकर होते; तस्मात् तो पवित्र तुरुंग, त्या प्रोफेसराच्या वाट्याला यायला नको !

**ज्युईस** : मि. विड्याढर,–( दागिन्याचा डबा, पत्रें व फोटोज् दाखवित ) सी दीज थिंग्ज्! बघ हें संमडा !

**विद्याधर** : तुला हें सारं कसं मिळालं रे–? त्याच्या ट्रंका वगैरे फोडल्यास वाटतं–?

**ज्युईस** : ( किल्ल्याचा जुडगा दाखवून हंसतो. )

**तर्कतीर्थ** : ( आनंदून भेटत ) भली केलीस दोस्त ! आहेस, सी. आय्. डी व्हायच्या लायक आहेस !!

**विद्याधर** : ( दागिन्याचा डबा पाहून ) अस्सं ! एकूण, काकाच्या मालकांची मुलगी पळविण्यांतहि, हा बदमाष प्रोफेसर आहेच म्हणायचा !

**ज्युईस** : मि. विड्याढर, टू जरा सायलेन्ट राहूनश्यान हंलूं बोल ! अरे बाबा, ये बंबई मंडला ग्रँड् होटेल हाय ! पुन्याचा टो टुजा मला नाय !

**तर्कतीर्थ** : अरे, हो ! हो ! ठाऊक आहे आम्हांला ! हा बनेश्वराचा मळा नसला म्हणून काय झालं–? हॉटेल तरी आहे ना ? इथंच तर चोरा-पोरीचे गुन्हे राजरोस चालतात !

**ज्युईस** : हां पण टे मामा ! असं टुमच्यावानी बोंबलूनश्यान् नाय डिसट; टर टेला असाँ हॉटेल बॉयचा काम अगोडर करावा लागटे बाबा ! ( विद्याधरास ) मि. विड्याढर, ये हाय बडा ग्रँड्-होटल ! ये मंडी लई लई लोक, लांबूनश्यान् राह्यला येटे ! जशा डाकू बी इठं उटरटे, टसा जन्टलमन्‌बी येऊनश्यान् राहटे ! टवा, आमी टुमास्नी फिरूनश्यान वॉर्निंग डेटे कीं, टुमी डोघांनीं सायलेन्ट बिलकुल सायलेंट राह्या होवा ! नायटर, माजा संमडाच प्लॅन् बिघरूनश्यान् जायेल ?

**विद्याधर** : खरंय तुझं म्हणणं !

**तर्कतीर्थ** : बरोबर बोललास ज्युईस ! अरे आपल्याला इथं, जणुं काय एखाद्या सी. आय्. डी. प्रमाणं वावरायला हवंय ! उगीच कॉम्रेडी घाला घालून हे सारं जमायचं नाहीं ! बरं पण, तो आमच्या कार्टीला कुठं घेऊन गेलाय ?

**ज्युईस** : टो मघाच गौरीला घेऊनश्यान्, मेट्रो पिक्चरला गेला हाय !

**तर्कतीर्थ** : इंग्लिश सिनेमालाच ना ? झालं ! आतां पांढऱ्या पडद्यावरलीं चोरटीं चुंबनं पाहून, तो तिचे अंधारांत काय काय हाल करील, तें तिची तीच जाणें !

**विद्याधर** : मला वाटतं ज्युईस; हें सारं मी आतां माझ्या ब्लॉकमध्यें घेऊन जातो. आणि सारं तपासून, मगच पोलीसमध्यें वर्दी देतों. तोंपर्यंत काका, आई, गुरुराव-सारेच इतक्यांत इथं येतील ! ( जाऊं लागतो. )

**ज्युईस** : हां ! पन मि. विझ्याढर, टुमी जरा मिशीबिशी लावूनश्यान जरा ओरिजिनल् आपली फिगर बडलूनश्यान रावा ! आन ओ यू मि. टर्क टीर्थ चिवडेबुवा, टुमी अगोडर ये आपली मिशी काढूनश्यान् बुट-पाटलोणशास्त्री व्होवा !

**तर्कतीर्थ** : छान ! म्हणजे महापातक नाशनार्थ म्हणून सक्षौर प्रायश्चित् कोणी घेतात; पण मला मात्र दुसऱ्याच्या पातकाकरितां, तुझ्यासारख्या एका ज्यूनं मिशा बोडायची पाळी-या मुंबई शहरांत आणावी, तस्मात् " कालाय तस्मै नमः " म्हणायचं, दुसरं काय ?

**विद्याधर** : अहो, मामा ! चालायचंच हें ! चला, या मुंबईत राहून तुम्ही जर मिशा बोडणार नसाल, तर मग तुम्ही आमचे मामा कसचे ? करा कीं मुंडण ? हं, सागरे सर्व तीर्थानि !

**तर्कतीर्थ** : पण पापपुण्यं पृथक् पृथक् ! बाकी, मुंबईत मिशा नसणं, हीहि एक फॅशन्च आहे म्हणायची ! चल, बाबा ज्युईस ! काढ तुझा व्हॉयलेट सेफ्टी रेझर ! अगोदर हें देवकार्य उरकूनच, मग बाथरूम-प्रवेश करतों ! ( जाऊं लागतो )

**ज्युईस** : आन मग माजा हज्बंड् बनूनश्यान् टुमी राव्हा ! अंऽ !

**तर्कतीर्थ** : ( साश्चर्य ) काय, मी तुझा हज्बंड्-म्हणजे नवरा ?

**ज्युईस** : हां ! हां ! नोवरा ! माजा यजमाण, पट्टी ! टसा आज झाल्या विगर त्ये प्रोफेशरचा टुमी अमी बाप कशा बनेल ? ( लाडावून ) यस्, कम् अलाँग-माय लव्ह !

**तर्कतीर्थ :** ( मोठ्याने हंसत ) लव्ह, हजबंड मामा ! अरे, विद्या ! आजपर्यंत "मागून-पुढून बापच नवरा" अशी म्हण प्रचारांत होती, पण आतां मात्र "करून सवरून मामाच नवरा " असं म्हणायची पाळी लवकरच मुंबईकरावर येणार आहे ! चला, मुंबई म्हणजे अखिल जगाचं एक तीर्थवणी क्षेत्र ! तेव्हां इथं जगांतले सारे विधि हें व्हायचेच ! ( दोघेहि गळ्यांत हात घालून जातात. )

**विद्याधर :** ( सारे पुरावे पहात ) अरेरे ! हा एकंदर सारा पुरावा उद्यां जर मी जगापुढं आणला, तर आमच्या या चालू शिक्षण पद्धतींचं नाटक, हें सर्वांनाच दुःख-पर्यवसायी वाटून समाजाला तापदायक होईल !

[ वसंत-रूपक ]

**नाट्य-कृतीला कारण व्हाया ।**
**भय-प्रद हा, क्रांति कराया ।**
**जनता त्यागिल, ज्ञान-पथा या ॥ धृ० ॥**
**मन ना वांच्छित मौन धराया ।**
**परि सु-जनां निववाया ।**
**दोष उणा, कार्य गुणाया ।**
**जगत् ऋणि बोधुनिया घ्या ॥ १ ॥**

[ विद्याधर जातो. उलट बाजूनं प्रो. आचार्य व कु. विद्यागौरी हें प्रवेश करतात. दोघांचाहि करमणुकीला जातांना करते वेळचा अप्-टू-डेट् पोषाख. चिंतातुर विद्यागौरी ]

**प्रो० आचार्य :** बस-बस-बस ! इतक्या दीर्घ काळभर आजपर्यंत कोणीच कुणाचं चुंबन घेतलेलं मी कांहीं कुठल्याच सिनेमांत पाह्यलं नाहीं ! ( कपडे काढीत. ) खरंच, गौरी ! तूं आजपर्यंत, एकदां तरी चुंबनीय बोलपट पाहिला होतास कां ? ( ती मौन धरते ) सांग ना ? गौरी,—

**विद्यागौरी :** माफ करा मला सर ! पण तुमच्या बरोबर फिरून तुम्ही मला कधीं सिनेमाला नेऊं नका !

**प्रो० आचार्य :** कां बरं ? भावना बळावतात कां विकार उद्भवतात ? बाकी, सिनेमा-गृहांत अंधार असल्यानं असं कांहीं तुम्हां तरुण मुलींना होणं साहाजिकच

आहे! तशांत, तें इंग्रजी बोलपट म्हणजे नुसतां चुंबनांचा वर्षाव! या कामी इंडियन् पिक्चर्स् तर निव्वळ एकदम थर्ड क्लासच असतात! सारं कांहीं नायक-नायिकेचं लांबून लांबूनच चालतं! छेः कुठल्या महारणींना, नटी म्हणून हें देशी चित्रपटवाले निवडतात, नकळे! आणि म्हणून तर आमचा देशी चित्रपट धंदा मागासलेला आहे (तुच्छता दर्शवीत) छे! रद्दी देशी बोलपट पहाण्यापेक्षां, मी तर तुम्हां विद्यार्थ्यांना सरळ तमाशाच पाहाण्याचा सदुपदेश करीन? कारण, तमाशांत नॅशनॅलिटी आहे? राष्ट्राचं कामुक-चैतन्य आहे! शिवाजी महाराजांनीं ही करमणूक, राष्ट्रीय म्हणून ठरविलीय! तेव्हां तमाशा ही संस्था, आर्यांची ठेव आहे!

**विद्यागौरी :** (चिडून) सर, हा विषयच बन्द कराना? माझ्या मस्तकानंच आज तिडिक घेतलेली आहे! कुठून मला दुर्बुद्धि झाली नि मी तुमच्या बरोबर या मुबंईत आलें! [पलंगावरील उशींत तोंड खुपसून रडूं लागते.]

**प्रो. आचार्य :** अस्सं! एकूण, आज तुझं कुठं तरी बिघडलेलं दिसतंय! नाहींपेक्षां, एवढ्या या लोकशिक्षणाच्या धंद्याला तूं अप्रिय मानतीसच ना!

**विद्यागौरी :** हें पहा प्रोफेसरसाहेब! मला ही तुमची बडबड आतां अगदीं असह्य होऊं लागलीय! बन्द करा पाहूं हा नाटक-सिनेमाचा विषय?

**प्रो. आचार्य :** (मिश्किलपणें) म्हणजे? माझी ही बडबड तुला आतां अगदीं असह्य व्हायला लागली? बरोबरच आहे! कारण, तुला आतां कोरडी बडबड नको असणार! तर बुईथ ॲक्शन हवी असणार! वा! तर मग—

(तो पलंगावर बसतो, तोच विद्यागौरी उठते)

**विद्यागौरी :** शीः! किती पण तोंडाची घाण येतेय तुमच्या! तुम्ही दारू बिरू तर झोंकीत नाहीं ना?

**प्रो. आचार्य :** गौरी, दारूची लज्जत, दारू घेणाऱ्यालाच कळतें! तूं अजून उमरखय्याम वाचला नाहींस वाटतं? तो म्हणतो, 'द्राक्षाच्या मांडवाखालीं आपल्या प्रियतमेला मांडीवर बसवून, एक हात तिच्या गळ्यांत नि दुसरा हात मदिरेच्या सुरईत गुंतविणाऱ्यालाच, नंदनवनांतलं स्वर्गीय सौख्यहि, तुच्छ वाटू लागतं!'

**विद्यागौरी :** ( साश्चर्य ) काय ? तुम्ही दारूडे-ढूंकर्ड अहांत ? सर, तुम्ही दारू पितां— ?

**प्रो. आचार्य :** खोटं कशाला बोलूं ? होय, मी दारू घेतों ! दररोज पितों ! दारू मला ब्रेन-टॉनिक् वाटतं ! वर्गांत, परिक्षेंत, पेपर तपासतांना, घरींदारीं, चारचौघांत, गुत्त्यावर–कुठंहि नि केंव्हांहि मी दारू पितों ! काय म्हणणंय यावर–तुझं ?

**विद्यागौरी :** ( कानावर हात ठेवीत ) शिव ! शिव ! ऐकणं नको ! कुठून माझ्या मनाला भूरळ पडली नि मी तुमच्या सहवासाला-आश्रयाला आलें ! ( रडत ) आई, बाप, घर-दार, आप्तइष्ट नि गणगोत सोडून, या बकाली वस्तीच्या पण मवाली माणसाच्या बरोबर मी मुंबईस आले !

**प्रो. आचार्य :** मग आतां मुंबईस आल्यासरशी तूं एकदां आपल्या जिवाची मुंबई तर करून घे. इथं रडण्या-भेकण्यापेक्षां,-हंसत-खेळत मौजमज़ाह करण्यांतच विशेष गंमत आहे ! या खिडकींतून बाहेर नजर फेक; तुला किती तरी चोरटी विलासी कामुक जोडपी, त्या स्वच्छ चांदण्यांतल्या शीतळ चन्द्रप्रकाशांत गळ्यांत गळा घातलेली समुद्र किनारीं दिसून येतील ! चल, आपणहि जरा त्यांच्यांतच सामील होऊन, मौज करूं या ? ( घड्याळाकडे पाहून ) आत्तांशीं कुठें दहा वाजताहेत ! चल पाहूं ? ( तिचा हात धरून तो ओढूं पाहतो. ती दूर होते. )

**विद्यागौरी :** ( हात सोडवून ) तुमच्या या संभाषणानं मात्र, माझ्या अंगाचा कसा अगदीं दाह झाला आहे ! तुम्हांला आतां " सर " म्हणायचीहि मला लाज वाटूं लागलीय !

**प्रो. आचार्य :** होय ना ? तर मग त्या " सरकी"ला, बेलाशक तूं आपल्या मनांतून दूर कर नि मला निमुटपणें आपला "डिअर" म्हणून हांक मार ! नाहीं तरी या हॉटेलांत, आपण " नवरा-बायको " म्हणूनच उतरलोंय !

**विद्यागौरी :** ( संतापून ) उतरला असाल ! मला काय करायचं त्याच्याशीं, माझी मी स्वतंत्रच आहे !

**प्रो. आचार्य :** ( उपरोधिक ) " स्वतंत्रच आहे, " ! एक लाथ मारून, स्त्री-परतंत्रता पटवून देऊं कां–? भाग्य समज कीं, मी पंधरा दिवस तुला अशी कोरी करकरीत राहूं दिली–! कारण, एकदम घिसाडघाई करणं; माझ्या

विद्वत्तेला, शैक्षणिक लायकीला, सामाजिक दर्जाला नि प्रौढ वयाला,-थोडक्यांत नकली सभ्यतेला-मला प्रशस्त दिसलं नाहीं! नाहींपेक्षां, तुझं कौमार्य मी आल्याबरोबरच भ्रष्ट करून, लग्ना-अगोदरचा मधुचन्द्र उरकून घेतला असतां! ( पाठीवर हात मारीत ) बेटा, तूं अजून कोणत्या भ्रमांत आहेस?

**विद्यागौरी :** ( बावरत ) भ्रमांत-?! खरंच, मी कोणत्या भ्रमांत आहे? मी भ्रमांत आहे कां उच्च शिक्षणाच्या नादांत आहे? कुठं आहे मी? देवा,—

**प्रो. आचार्य :** गौरी-! अशी बावरूं नकोस! दचकूं नकोस! भिऊं नकोस? तूं इथं, या मुंबईतल्या एका ग्रँड् हॉटेलांत पण आपल्या आवडत्या प्रोफेसराच्या सहवासी-प्रेमांत आहेस!

**विद्यागौरी :** अरेरे! राक्षसा, काय हें मला ऐकवतोयस-? पवित्र विद्यादानाच्या पुण्य-क्षेत्रांत,-सरस्वती देवीच्या विद्या-मंदिरांत, तुझ्यासारखे विषय-कर्दमांतले,—

**प्रो. आचार्य :** ( मध्येंच ) कोण? किडे कां गाढव? काय, म्हणायचंय काय तुला? गौरी, भाबड्या पोरी! या शिक्षणाच्या हव्यासानं, आजच्या या चालू शिक्षण-क्षेत्रांत, तुमच्यासारख्या तरण्याजान पोरींच्या कशा नि किती आहुत्या पडताहेत हे तुला अद्याप नीटसं कळलेलं दिसत नाहीं! ऐक तर तें! किंवा मी माझ्या सागरकर हायस्कुलांतल्या चौदा मुलींचें तुला पत्तें देतो! त्यांना मुद्दाम जाऊन भेट नि विचार समक्ष तोंडावर कीं; तुम्ही आपलं शिक्षण, सध्यां कोणत्या उपायानं घेत अहांत-? कोणत्या निश्चित ध्येयानं म्हणून, तूं त्यांना विचारूं नकोस! कारण, त्या तुला हंसतील—? उपहांसतील!!

**विद्यागौरी :** काय म्हणालांत-? चालू शिक्षणाला मुळींच ध्येय नाहीं-?!

**प्रो. आचार्य :** या प्रोफेसरचा तुला जर कबुली जबाब घ्यायचा असेल, तर मी कंठरवानं ओरडून म्हणेन कीं,-आजच्या या चालू इंग्रजी शिक्षणाला मुळींच ध्येंय नाहीं! आणि ध्येंय असलंच तर तें खाणं-पिणं नि कॉलेजांत मजा मारणं, एवढ्यापुरतंच होय!

**विद्यागौरी :** ( संतापून ) खोटं-साफ खोटं! तुमच्यासारख्या,—

**प्रो. आचार्य :** ( मध्येंच दरडावून ) चूप ! माझं हें म्हणणं खोटं ठरविण्याची, आज प्रत्यक्ष बॉम्बे युनिव्हर्सिटीची देखील प्राज्ञा नाहीं ! किंवा तिच्या सिनेट मधला एकहि सभासद माझं हें विधान खोडून टाकणार नाहीं ! शिवाय, खोटं वाटत असल्यास प्रत्येक खुशाल चेंडू विद्यार्थी-विद्यार्थिनींना जाऊन विचार कीं, शाळा-कॉलेजांतून तुम्ही सध्यां कोणतं शिक्षण घेत अहांत ? दिवसांतून टिवल्या-बावल्या करीत, स्वच्छंद बागडण्यांत नि ठराविक अभ्यासांत,–पण किती वेळ घालवितां ? विद्यार्जनाच्या निमित्तानं पालकांकडून येणाऱ्या पैशाचा विनियोग, कोणत्या भोगैश्वर्यांत खलास करतां ? फार काय, पण वाड-वडिलार्जित संपत्ति बरोबरच, स्वतःच्या शरिराचा ऱ्हास, हा कां नि कसा करतां ? जा. विचार जा.

**विद्यागौरी :** तर मग प्रोफेसरसाहेब, आपणच या बाबत समाजाला दिव्यांजन घालून, मला माझ्या आईबापाच्या घरीं अगोदर नेऊन पोंचवा ना ? या दिखाऊ शिक्षण चक्रव्यूहांत शिरण्याची, माझी आतां मुळींच तयारी राहिली नाहीं !

**प्रो. आचार्य :** तयारी नसल्यास, तयारी कर ! चालू शिक्षणांतल्या चक्रव्यूहांत, मी तुझा मार्गदर्शक झालोंच आहे !

**विद्यागौरी :** मग मी काय करूं म्हणतां ?

**प्रो. आचार्य :** गुरुला प्रथम "प्रेम–प्रदान" करून नंतर मग,—

**विद्यागौरी :** ( दचकते ) काय म्हणतां ? शिक्षणाकरतां शील भ्रष्ट होऊं ?!

**प्रो. आचार्य :** हो ! पण ते केवळ कॉलेज शिक्षणा पुरतंच !

**विद्यागौरी :** ( संतापून ) बस्सं ! पुरे करा हा बाष्कळ पाजीपणा !

**प्रो. आचार्य :** काय म्हणतेस ? बाष्कळ पाजीपणा पुरें करूं ? होय ! तो पुरा करण्याकरतांच तर ही आजची माझी तयारी चाललीय ! एकदां कां आज तुला मी भ्रष्ट केली,—

**विद्यागौरी :** ( अंगावर उसळून ) अरेरे मांगा ! काय हें तूं बरळून राहिलाहेस ? एका निष्पाप कुलीन कुमारिकेच्या बाबतींत, काय हीं तूं भलतीच पापवासना, आपल्या मनांत बाळगिली आहेस ? मेल्या, तुला हें बोलवतं तरी कसं ?

**प्रो. आचार्य :** ( निर्लज्जहास्य ) तरमग तूं एकदम मला आलिंगन देऊन माझं तोंडच बंद कर ना ? म्हणजे हा फुकट बोलण्यांत जो, ( हात धरूं पहातो. )—

**विद्यागौरी :** ( झिडकारीत ) दूर हो ! शिक्षण-समंधा, खबरदार जर माझ्या अंगाला स्पर्श करशील तर ! चांडाळा, तुझ्यासारखीं सुशिक्षित पिशाच्चं, आजच्या शिक्षण-क्षेत्रांत इतपत नंगानाच घालीत असतील, असं मला आज-वर वाटलं नव्हतं !

**प्रो. आचार्य :** ( हात पुन्हां धरून ) पण आतां तरी या अनुभवानं तुझी खात्री झाली ना ? गौरी, ही फुगडींची धडपड, या वेळीं फुकट आहे ! कारण, या प्रो. आचार्यांच्या बाहुपाशांत आलेल्या तुझ्या सारख्या शिक्षणेच्छु घोड उपवर कुमारीका, शेवटीं मातृपद घेऊनच, त्या लग्नाच्या नवऱ्या म्हणून बोहोल्यावर चढल्या आहेत !

**विद्यागौरी :** ( हात सोडवीत ) चढल्या असतील; पण ही गौरी तुला प्राणांतिहि वश होणार नाहीं ! चल, दूर हो ! सैताना-सोड माझा हा हात ( हात सोडवायची धडपड करीत राहते. )

**प्रो. आचार्य :** ( हाताला हिसके देत ) हं-हं-हं-हा असा हात सोडवायचा-प्रयत्न करशील, तर आत्तांच्या आत्ता मला, तुला लाथ मारून आपला कार्य-भाग उरकून घ्यावा लागेल, समजलीस ? महामूर्ख पोरी, आपल्या जन्मदात्या आई-बापाशीं नि सख्या सुशिक्षित वडिल भावांशीं भांडून, तूं ज्या वेळीं माझा हात धरून, इथं, या मुंबईत माझ्या बरोबर आलीस, त्याच वेळीं माझ्या पुरत्या काबूंत येऊन माझी " रखेली विद्यार्थिन " झालीस ! ऐक ! या क्षणीं; मी तुझ्यावर हवातस्सा जरी अत्त्याचार केला; तरी मला इथं कोणीही आडवूं शकणार नाहीं ! कारण, तूं माझी बायको म्हणून, सध्यां मजबरोबर राहतेस, हें विसरूं नकोस ! ( हाताला हिसडा देऊन, तो तिला पलंगावर बसवितो ) जा. नीट क्षणभर स्वस्थ पडून या गोष्टींचा विचार कर ! शील—पावित्र्याच्या कल्पनेंनं तुझं डोकं फारच बिघडलं गेलं असेल तर-तर ! ( बेल वाजवितो. तोंच मि. ज्युईस हा स्वतः सुंदर ख्रिश्चन पोरीच्या वेषांत व तर्कतीर्थ-मामा मिशा वगैरे काढून थेट गोव्याच्या फर्नांडिस वेषांत " ऑर्डर-ऑर्डर " म्हणत प्रवेशतात. )

**दोघेजण :** यस्-सर ! ऑर्डर–!

**प्रो. आचार्य :** ( दोघांस ) दो व्हिस्किकी बॉटल्स् सोडा और आईस—

**तर्कतीर्थ :** सर, ग्वाँयंच्या फेनीचाँ, तूंस ड्रिंक नक्कों ? सर, तुका गोंयचीं फेनी नाय–?

**ज्युईस :** ( नेत्रकटाक्षादि सारे अंगविक्षेप करीत ) वेणी-फेणी ह्यों ! आँ ग्वाँयंच्याँच !

**प्रो. आचार्य :** काय म्हणतां-? गोव्यांतली काजूची फेणी आहे–?

**तर्कतीर्थ :** आँ अस्साँ ! ग्वाँयंच्या फेणींत आँऊं आस्साँ ! गुडाड्रिंक्क अस्साँ-?

**ज्युईस :** आँ स्पेशल आँऊंच्या वेणीजों-फेणीचाँ म्याँऊँ म्याँऊँ ड्रिंक अस्साँ !

**प्रो. आचार्य :** अस्सं ! म्हणजे तुम्ही दोघं, गोंव्याचें असून, ती तुम्ही प्रायव्हेट् म्हणून आणली आहे, होय–?

**तर्कतीर्थ :** अस्साँ ! म्याँऊँ घरच्यों, फेणी ऑऊँचाँ !

**ज्युईस :** ( लाजत मुरडत ) म्याँऊं ऑऊंचाँ, खाऊंचाँ आन् पिऊंचाँ-अस्साँ-अस्साँ-आँऊं, ग्वाँयंचाँ–! ( तर्कतीर्थाच्या गळ्यांत हात घालतो )

**प्रो. आचार्य :** अस्सं ! अस्सं ! म्हणजे तुम्ही दोघंहि गोव्यांत, तींच खातां पितां होय ?

**दोघेजण :** आँ अस्साँ–!

**प्रो. आचार्य:** तुम्ही दोघं नवरा-बायको अहांत कांरे–?

**तर्कतीर्थ :** यस्-सर ! आय् ॲम् हर हजबंड ! ग्वाँयंच्याँ अस्साँ !

**प्रो. आचार्य :** बरं ! तुझं नाव कायरे ?

**तर्कतीर्थ :** नेम ? माय नेम इज फिस्को-दि-मांमा !

**प्रो. आचार्य :** ( साश्चर्य ) फिस्को-दि-मांमा ! वास्को-डिगामाचा वंशज आहेस वाटतं–?

**तर्कतीर्थ :** आँ-अस्साँ !

**प्रो. आचार्य :** बराच पुराण-पुरुष दिसतोंयस ! आतां तुझं नांव सांग पाहूं ?

**ज्युईस :** ( लाजत ) औंस्ताँऊं ज्यौंत्स्नाँऊं जिक्रिया ज्युज्यूं फिस्को-दि-माम्मा.

**प्रो. आचार्य** : अरे बापरे ! हें नांव आहे कीं, नांवाच्या आगगाडीची मालगाडी आहे. बरं पण, बेटा ! हा तुझा खरंच कां नवरा आहे ?

**ज्युईस** : ( लाजत ) ऑ—सिझनल अस्सॉ ! मी ना तूंस ग्वॉयंच्यॉ ! म्यॉऊं हजबंड औंचा-खौंचा-गौंचा ! ( नेत्रसंकेत त्यावर टाकतो )

**तर्कतीर्थ** : ना. नस्सॉ ! शी इज माय वाइफ्, परमनंट अस्सॉ ! टेंपररली नस्सॉ

**ज्युईस** : ( मुरका घेत ) ऑ ! ग्वॉयंच्यॉ इन्शुअरन्स, ऑऊं केलॉ असॉ !

**प्रो. आचार्य** : ओहो ! यंव रे यंव मुरका ! याचं नांव परकरी मुरका ! नाहीं पेक्षां, आमचा हा महाराष्ट्रीय मालमसाला पहा ! खकाणा उडवीत फुकटच कपाळाला आठ्या घालून बसलाय ! छेः मूर्ख कुठली !

**ज्युईस** : सर ! इज शी युवर वाईफ् !

**प्रो. आचार्य** : यस् शी इज माय कंप्लीट मॅरिड वाईफ् ! नुकतेंच आम्ही सिनेमाला जाऊन आलों आहोंत. तेव्हां, तिचं लागलंय डोकं दुखायला. नुकताच ही माझ्याशीं भांड भांड भांडली आणि आतां स्वस्थ रडत बसलीय ! अंगांत जरा हिच्या कडकीचा विकार आहे !

**तर्कतीर्थ** : अस्सॉ ! ऑगच्यों कडक्यों असॉल, तर ग्वॉयंच्यॉ फेणी पिऊंच्यॉन ! ऑ औंचौंच ( तडक आंत निघून जातो. )

**प्रो. आचार्य** : ( पलंगावर जवळ जाऊन बसत. ) पाहिलंस, प्रिये ! हें किती प्रेमळ गोंव्याचं जोडपं आहे ते ! तुला कडकीचा विकार आहे असं म्हणतांच, हिचा नवरा पहा एकदम कसा गोंव्याची फेणी आणायला आंत गेला तो ! फेणी म्हणजे दारू तूं समजूं नकोस. तें एक काजुगराचं थंडसं कोल्ड्रिंक पेय आहे !

**ज्युइस** : यस् यस् कोल्ड्रिंक ! ग्वॉयंच्यॉ कोल्ड्रिंक ( नेत्रसंकेत )

**प्रो. आचार्य** : गोव्यॉतलंच कोल्ड्रिंक ना ?

**ज्युईस** : ( मुरका घेत ) ऑ. अस्सॉ ! म्यॉऊं औंचॉ, बौंचॉ, पिऊंचॉ.

**प्रो. आचार्य** : छे छे ! तुला कोल्ड्रिंक कोण म्हणेल ? तूं तर त्या गोंव्यांतल्या फर्नांडिस वाढप्याची डब्बल रोटी आहेस ! तेव्हां, ती फेणी बरोबर खाण्यापेक्षां, कृष्णा कांठच्या या लोण्याबरोबरच पचविलेली बरी ! बेटा, आहे हा नवरा तुला आवडतो कां ?

**ज्युईस :** ना ! ना तूंच ऑऊं म्यॉऊं हजबंड, हॉच्यॉं ! ऑं-ऑं—

[ एकीकडे नेण्याचा नेत्रसंकेतवजा इषारा. ]

**प्रो. आचार्य :** ( त्याच्या जवळ येत ) काय- काय म्हणत्येंस— ?

**ज्युईस :** ( एकदम गळ्यांत हात घालींत. ) मौंचॉं हजबंड ऑं-ऑं —

**प्रो. आचार्य :** काय ? तूं मला आपला नवरा—( तों तोंडावर हात ठेवितो. )

**ज्युईस :** ( त्याला धरून ओढीत ) ऑं ना अस्सॉं बॉच्यॉं ! मॉं हजबंड ऑंच्यॉं ! मॉं राहूच्यॉं ! ( कामुक अंगविक्षेप करतो. )

**प्रो. आचार्य :** हाय हायरे ! मारडाला ! यंव रे गुडलक. ( जातां जातां ) प्रिये, हिचं म्हणणं काय आहे, तें मी ऐकून येतोंच बरं कां इतक्यांत ? चल गोमांतके ! तुझं गुडस् शेड् तरी पाहूं या !

**ज्युईस :** ( आंत नेत ) पॉंऊंच्यॉं, ऑंऊंच्यॉं, जॉंऊंच्यॉं ! ऑं-ऑं अस्सॉं !

[ मि. ज्युईस व प्रो. आचार्य आंत जातात. ]

**विद्यागौरी :** देवा ! मी होतें कुंठं नि आलें कुठं ? करत्येय काय नि होणार आहे काय ? देवी सरस्वती, तुझ्या मंदिरांत , विद्येच्या नांवाखालीं जर हा असाच अंधार असेल, तर त्यांत चांचपडत राहणाऱ्या माझ्यासारख्या भोळ्या कुमारिकांनीं या चालूं शिक्षणापासून चार पावलं लांबच राहिलेलं, बरं नाहीं कां —?

[ भैरवी-धुमाळी ]

**जय देवि भारती तुला प्रणामांजुलि ।**
**पदिं तुझ्या प्रसादा, ज्ञानाची अर्पिली ॥ ध्रु० ॥**
**मनिं आस जिवाला छंद सदा लागला ।**
**गे, बोध-प्रचारक तुझिया मंदिरीं खला ।**
**कां कुणा कुणांच्या गुणांत पाहूं तुला ? ।**
**ना मला लालसा । उगाच बिरुदावलि ॥ १ ॥**
**मग केविं नुरविल भला । हो पतित मलिनागळा ! ।**
**मोर-पिसा सम शोभला । आळविले गुरुला ।**
**शारदे, सुहासिनी ! नुमजे मज भावा, मति मंदावली ॥२॥**

[ व्हिस्की वगैरे सारे जिन्नस घेऊन तर्कतीर्थ प्रवेशतो. ]

**तर्कतीर्थ :** ( खोकत ) ऊं ! कसं काय चाललंय शिक्षण ? ठीक आहे ना गौरी ?

**विद्यागौरी :** कोण–कोण अहांत आपण ? आपला शब्द ओळखीचा—

**तर्कतीर्थ :** आहेतर ? मी तुझा मामा तर्कतीर्थ नव्हे कां ? पोरी, कॉलेजची टर्म त्या प्रोफेसरानं भरली असेलच ?

**विद्यागौरी :** खरंच कां तुम्ही मामा आहांत ? मामा—( रडूं लागते. )

**तर्कतीर्थ :** आतां कां मामाच्या नांवानं रडत्येस ? अं ! चांगली मी तुला लग्नाची मागणी केली, तेव्हां तूं मला कामापुरताहि मामा न समजतां माझ्या मुस्काडांत मारलीस ! भली खोड मोडली, तुझी त्या प्रोफेश्वरानं ! कॉलेज शिक्षणाचा मोह ! बी. ए. ची घमेंड ! कळला ना चालूं शिक्षण-प्रताप ? कां अजून पुढचा विधि उरकून घ्यायचाय या मुंबईत ?

**विद्यागौरी :** ( मामाचे पाय धरीत ) नका, मामा ! मी तुमच्या पायां पडत्यें ! मला आतां असं टाकून, उणं अधिक बोलूं नका ! मी मेल्याहूनहि मेलेय ! मामा, अगोदर दादाला इथं बोलवून घ्या; नाहींपेक्षां, तुम्हींच मला या संकटांतून सोडवा ! ( रडूं लागतें. )

**तर्कतीर्थ :** म्हणजे ? शिक्षणाची हौस मावळली तुझी ? आईबापाचं प्राण घेणारं शिक्षणं, इतक्यांतच सोडूं पहात्येस ?

**विद्यागौरी :** चुकलें म्हणतें ना मी मामा ! पण अगोदर मला इथून सोडवा ! केव्हां, मी आईची क्षमा मागून,—

**तर्कतीर्थ :** आईची क्षमा मागते म्हणे ! जा आतां तिथं स्वर्गांत !

**विद्यागौरी :** ( घाबरत ) म्हणजे ? काय बोलतां हे तुम्ही मामा ?

**तर्कतीर्थ :** जें खरं दिसलं–नव्हे घडलं. तेंच मी बोलतोंय ! गौरी, तूं प्रोफेसराचा हात धरून निघतांना, आपल्या आईला काय काय दुरुत्तरं बोललीस, दुधखुळ्या पोरी ! याची तुला कांहीं आठवण आहे कां ? ( सुस्कारत ) सुटली बिचारी अक्का या संसाराच्या जंजाळांतनं !

**विद्यागौरी :** नका! मामा, मला असं फार वेळ बुचकळ्यांत ठेवूं नका! सांगा-सांगा! आईनं आपल्या जीवाचं कांहीं बरं वाईट तर करून घेतलं नाहीं नां? काका कुठंय? दादा कुठंय?

**तर्कतीर्थ :** गौरी, तुझ्या सूचनेप्रमाणं आक्कानं आपली इथली जीवित यात्रा, तूं घराबाहेर पडल्याबरोबर विहिरींत जीव देऊन संपविली!

**विद्यागौरी :** ( रडून ) काय–काय सांगतां,–आई गेली?

**तर्कतीर्थ :** होय! तुझ्या सदिच्छेप्रमाणं माझी आक्का गेली! आतां ऐक– आक्कांनीं जीव देतांच, काकाहि वेडे झाले आणि काकाहि वेडे झालेले पाहून, घरीं आलेले समदुःखी पाहुणे गुरुराव दीक्षित मास्तरहि वेडे बनले!

**विद्यागौरी :** अरेरे! आगलागो माझ्या या शिक्षणाच्या हव्यासाला! माझं चालूं शिक्षण, आईबापाचं जीव घेणारं आहे,–असं जर मला अगोदर कळतं; तर मी जन्माची अशिक्षित राहून, एखाद्या निरक्षर नांगऱ्याशीं सुखासमाधानानं संसार करीत, दोघांनाहि सुखीं केलं असतं! मामा मी मुळीं सुशिक्षिताशीं लग्नच करणार नाहीं! बरं, दादा कुठंय–?

**तर्कतीर्थ :** तो तुझ्या लव्हरला-त्या पाजी प्रोफेश्वराला चतुर्भूज करायच्या तयारींत आहे! अग, तुला माहित नाहीं! तुझा हा प्रोफेसर आचार्य, मोठा डॅबिस-बाहेरख्याली माणूस आहे.

**विद्यागौरी :** ( रडत ) आतां मला दादा काय म्हणेल–?

**तर्कतीर्थ :** तो तुला कांहीं बोलणार नाहीं! येईलच तो पोलीसासकट इथं वेळेला! अग, आमच्याजवळ सगळा कांहीं जय्यत पुरावा तुडुंब भरलेलाय, त्यांत तुझीं देखील चार-दोन पत्रं आहेत हो!

**विद्यागौरी :** ( घाबरत ) पण-पण तीं—

**तर्कतीर्थ :** नाहीं! तशीं तीं कांहीं लव्ह-लेटर्स-या सदरांत येत नाहींत! पण घर सोडून तुझी स्वखुषीनं त्याच्या बरोबर पळून जाण्याची तयारी मात्र स्पष्ट दिसते! मग तें शिक्षणाकरतां असो किंवा भानगडीकरितां असो! पण तीं त्या प्रोफेश्वराला अनुकूल आहेत एवढं मात्र खरं!

**विद्यागौरी** : नाहीं हो मामा ! केवळ शिक्षणाच्या उच्च लालसेला बळी पडून, मी तीं लिहिलीं आहेत !

**तर्कतीर्थ** : पण त्यावरून तर त्यानं तुला आपली बायको म्हणून इथं आणली आहेना ? मग, तूं आतां पुढं काय करणार ?

**विद्यागौरी** : मामा, मी पोलीसना सारं खरं तेंच सांगणार !

**तर्कतीर्थ** : सांगशील ना खरं तेंच ! तर मग आपलं सामानसुमान घे पाहूं अगोदर ! चल, या शेजारच्या ब्लॉकमध्यें आम्ही सारें उतरलों आहोंत !

**विद्यागौरी** : खरंच ! केव्हांपासून ? ( स्वताचे सारें सामान आंवरून घेते तोंच **गणुकाका** व **सरस्वती** प्रवेशतात )

**सरस्वति** : तूं इथं आल्यापासूनच ! गौरी,—

**विद्यागौरी** : ( पाहून ) कोण आई ? आईच ना तूं ? ( रडत ) आई मला क्षमा कर.

**सरस्वति** : ऊठ, विद्ये ऊठ ! आईच्या मायेची कल्पना आज ना उद्यां तुला येणारच आहे ! तेव्हां, माझे हें बोल तुला आलेल्या या अनुभवानं चांगलें ध्यानांत ठेव ! ऐक ! तुम्हांला रजाचागज करून आम्ही वडिल मंडळी जी वाढवितो ती केवळ आमची अवज्ञा करण्याकरितां नव्हें, तर तुम्ही आज्ञाधारक बनून स्वतःचं कल्याण करून घ्यावं म्हणून !

**विद्यागौरी** : खरंच, आई ! मला आतां फारच पश्चात्ताप होतोंय !

**सरस्वति** : होय ना ? तर मग तूं हा आपला अनुभव आपल्या बरोबरीच्या चार मैत्रिणींना सांगून त्यांना उपदेश कर ! जन्म देऊन तुम्हाला पोसायचं, तुमचीं दुखणीं-बहाणीं पाह्यचीं; चांगले पैसे खर्चून शिक्षण द्यायचं ! आणि शेवटीं तुम्ही वयांत आलेल्या शिकलेल्या मुलींनीं करायचं काय ? तर आई बापांना न विचारतां खुशाल एखाद्या अनोळख्या माणसाचा हात धरीत घराबाहेर पडायचं किंवा वंश, धर्म, कुळ बुडवित, धर्मांतरानं विजातीय लग्न करायचं ! हें तुमचं तुम्हांला नि झालेल्या शिक्षणाला तरी शोभतं कां ?

**गणुकाका** : अग पण या प्रसंगीं, तुला तरी हें बोलणं शोभतं कां ? आपल्या पोरीनं तसं केलं नाहीं ना अजून ?

**विद्यागौरी** : ( वडिलांचें पाय धरून ) काका,—

**गणुकाका** : ऊठ बाळ ! अजून आमचं तोंड तूं पुष्कळच उजळ ठेवलंयस !

**तर्कतीर्थ** : ( मध्येंच ) हो ! धर्मांतरानं अधर्मीय नवरा करून, घराण्याच्या नांवा लौकिकाचा चुना करीत तों आईबापाच्या नाकाला फांसला नाहींस, यांतच झालेल्या अपराधाचं सौम्य स्वरुप आहे !

**गणुकाका** : अरे-अरे पण तुम्हीं दोघं हें काय म्हणून पोरीला बोलताहांत ? तुम्हा वडिल मंडळींचीं हीं असली कुचकीं-नासकीं बोलणींच, शेवटीं मुलांच्या आत्म—नाशाला कारणीभूत होतात !

**सरस्वति** : बरं, राहिलं ! संकटांतला उपदेश हा नेहमीं पथ्यकरच होतो !

**गणुकाका** : पण फाजील उपदेश झाला, कीं मग तो संकटांची परंपराच निर्माण करीत राहतो !

**तर्कतीर्थ** : खरंय काका ! सध्यां जगांत उपदेशच फार सवंग झालाय ! जो उठतो तो आपला उपदेश करीत सुटतो ! तरुण पिढीचा हा कल्पनातित बुद्धिभेद चाललाय ! अहो, तरुणांनीं आतां ऐकायचं तरी कुणा-कुणाचं ?

**गणुकाका** : आपल्या बापाचं ! आईचं ! घरच्या वडिलधाऱ्या मंडळींचं ! यांचा हितोपदेश ऐकला म्हणजे कुणाच्याहि बापाच्या बापाचा उपदेश चालणार नाहीं ! तेव्हां, विद्ये ! इथून तरी तूं माझं ऐकणार आहेस नां ?

**विद्यागौरी** : असं हो कां विचारतां काका ? मी कधिं तुमची अवज्ञा केली बरं ?

**गणुकाका** : नाहीं ! चालू नाटकावरून तें आम्हांला सारं कळलंच आहे !

**विद्यागौरी** : ( आईस ) आई, खरंच कां ग तूं जीव दिला होतास विहिरींत ? मग तुला कुणीं वाचविलं, तें सांग ना ?

**सरस्वति** : कुणी म्हणजे ? माझ्या विद्याधरानं, त्याच्या मित्रानं नि या माझ्या भावानं !

**विद्यागौरी** : काय मामानं ? मग मामा तुम्ही आतां असें खोटं कां हो बोललांत ?

**तर्कतीर्थ** : मला तुझी मनोभूमिका तपासून पाह्यची होती !

**विद्यागौरी :** आणि काका ? आईनं जीव दिला, म्हणून तुम्ही वेडे झाला होतां, होय ?

**गणुकाका :** आणि अजून मी कुठं शहाणा झालोंय ? तुला जन्म दिला, त्याच वेळीं मी वेडा ठरलोंय !

**तर्कतीर्थ :** बरं, अगोदर ही घे आपली वळकटी ! नि चल पाहूं आपल्या ब्लॉक मध्यें ? ( ती वळकटी घेतें. ) आक्का, काका, चला आपल्या ठिकाणी !

[ सर्व जातात. नंतर कांहीं वेळानं दुसऱ्या बाजूनं वेषांतरित मि. ज्युईस व प्रो. आचार्य हा दारूनं चिक्कार झिंगलेला झुकांड्या देत प्रवेश. ]

**प्रो. आचार्य :** प्यारी, सोड–सोड तूं त्या गोंव्याच्या बाटग्या गांवड्याला ! नि रहा माझ्याजवळ बायको बनून ! मी तुला हिंदू करून सुरेख दागदागिन्यानं एखाद्या गौरीसारखी नो–नो मंगळागौरीसारखी नटुन थटून सजवितों ! तुझ्याशीं रजिस्टर मॅरेज् करतों ! तुला बायको करून, सिनेमांत नटी म्हणून नाचवितो !

**ज्युईस :** अस्साँ ! टरमंग मी आँचा ! ना कुठं जाँऊंच्याँ !

**प्रो. आचार्य :** नकोच तूं आतां बाहेर पडूंस ! पण तसं नकोच तें ! आपण दोघं इथूनच आतां बाहेर पडूं ! इकडे ये ! तुला मी हिंदुस्त्रीचा पोशाख देऊन, चांगले दागदागिने घालून, सुंदर हिंदु लेडी करून सोडतो. ये इकडे ? हें घे—

[ सर्व सामान अस्ताव्यस्त झालेलें पाहून व विद्यागौरीहि नाहीशीं झालेली पाहून तो कांहींसा शुद्धीवर येतो. ]

अरेच्या माझं सामानसुमान कुणी तरी लांबवलेलं दिसतंय ! गौरीहि दिसत नाहीं ! ती पळाली वाटतं ! ( व्हिस्की वगैरे सामान पाहून ) आणि हें काय ? वाईन ऑर्डर ? ( त्यांतील पुन्हां दारू पितो. ) समजलों ! तुझ्या नवऱ्यानंच माझी बायको दागिन्यासकट पळविलीं वाटतं !

**ज्युईस :** बराँ झालाँ ! फिटंफाट झालाँ ! ( लडिवाळपणानं चाळे करीत व आणखी दारू पाजीत. ) मायाडिअर न्यू हजबंड, आ ना जाँउंच्यां ! म्याँ हाँ राँहुंच्याँच ! ( पलंगावर बसतो. )

**प्रो. आचार्य :** हो! तेंहि खरच! इथून वेषांतरित केल्याशिवाय, तुला पळवायची कशी? कारण, तूं पडलीस हॉटेलची नोकर! शिवाय, नवरा असलेली! छे! छे! पोलीसला वर्दी दिल्याशिवाय माझे दागिने कसे परत येणार?

[ तो ट्रंका पुन्हा तपासून पाहूं लागतांच त्याची नजर चुकवून स्त्री-वेषधारी ज्युईस हा आंत निघून जातो. नंतर विद्याधर व पो. इन्स्पेक्टर, एकदोन शिपायासह प्रवेश करतो. ]

छे! द्वारकीहि नाहीं आणि तिचें दागिनेहि नाहींत!

**विद्याधर :** इन्स्पेक्टरसाहेब, पकडा या आरोपीला! आत्तां इतक्यांतच या दागिन्यासंबंधीं नि पळविलेल्या मुलींसंबंधीं आरोपीनं आपला कबूलीजबाब दिलेला आहे! शिवाय, याचं हें एक पत्र, या प्रकरणाबाबत पुरावा म्हणून आपल्यापुढं हजर करतों! वाचा हें सारं! ( तो पत्र देतों व वाचतो. )

**पो. इन्स्पेक्टर :** ही द्वारका मुलगी कोण?

**विद्याधर :** पुण्यास माझे वडील ज्या दुकानांत मुनीम आहेत, त्यांचीं मुलगी. त्यांचं नांव, अनंत नरोबा तमेवार! ते इथं आले असून, माटुंग्याला उतरले आहेत. त्यांची मुलगी नि आमच्या गुरुराव मास्तरांची विधवा मुलगी, सध्यां आश्रमांतच आहेत!

**पो. इन्स्पेक्टर :** अस्सं! ( प्रोफेसरास ) तुमचं नांव काय हो—?

**प्रो. आचार्य :** नागेश एम्. आचार्य M. A; L L. B; S. T. C; B. T; ( बॉम्बे ) T. D. ( लंडन ) ॲन्ड् Ph. D. ( फॉरेन. )

**पो. इन्स्पेक्टर :** अरे, वा! बऱ्याच ठिकाणीं हा शिक्षण समंध गेलेला आहे, अं?

**प्रो. आचार्य :** हें पहा, दादासाहेब! सध्यां विद्यादेवीचें विविध विद्यालंकार तमाम दुनियेंत पसरले असल्यानें, आमच्यासारख्या ज्ञान-पिपासूंना सात समुद्र ओलांडून तें मिळवावें लागतात!

**पो. इन्स्पेक्टर :** हो! हो! मिळवावे लागतात तर! आणि हेंच शिक्षण. तुम्हांला असं चोऱ्या-माऱ्या करायचं तिथं मिळतं-? बदमाष कुठला!

**प्रो. आचार्य :** हां-हां दादासाहेब! असें असभ्यासारखें शिव्या काय देतां—?

**पो. इन्स्पेक्टर :** वारे सभ्य प्रोफेसर! हंटरखाली तुला चोपून काढला पाहिजे!

**प्रो. आचार्य** : जुलूम होतोंय हा दादासाहेब! हंटरनं बडवायला मी तुमच्याजवळ खोटं बोलेन, तरच ना तुम्ही मला मारणार—?

**पो. इन्स्पेक्टर** : अस्सं-? तर मग अगदीं खरं खरं सांगशील—?

**प्रो. आचार्य** : खोटं बोलण्याचं मला प्रयोजन—?

**पो. इन्स्पेक्टर** : (कागद चाळीत.) रावजी म्हसकूजी पाटोळे आणि सटवाजी धोंडिबा पांगारकर हें दोघे कोण आहेत—?

**प्रो. आचार्य** : तें माझे व्यवसाय बंधू असून, वर्गबंधूहि आहेत! पैकीं पाटोळें हे गृहस्थ मजबरोबरच बी. टी. झाले असून, तें जातीनं हरिजन आहेत. सध्यां ते एज्युकेशनल् सब्-इन्स्पेक्टर म्हणून बेळगांवला असतात!

**पो. इन्स्पेक्टर** : बरोबर! तेव्हां, त्यांनीं नि तुम्ही मिळून, एका विधवा मास्तरणीला पळविली! होय ना?

**प्रो. आचार्य** : नाहीं दादासाहेब! विधवा मास्तरीण पळवायला मी तितकासा त्यांचा भोक्ता आहे, असं नाहीं! कारण, मी स्वतः विवाहित आहे.

**पो. इन्स्पेक्टर** : अस्सं! तुमचं नेहमींचं राहणं कुठलं—?

**प्रो. आचार्य** : पुण्यास!

**पो. इन्स्पेक्टर** : तुमचं कुटुंब, कुठं शाळेंत नोकरीला आहे?

**प्रो. आचार्य** : छे! छे! तिला मी हिंगण्याला शिकायला ठेवलींय!

**पो. इन्स्पेक्टर** : तरीच तुम्हाला हें धंदे सुचतात अँ?

**प्रो. आचार्य** : नाहीं दादासाहेब! त्याचं असं झालंय कीं, परमार्थाला जसा लिंगभेद मान्य नसतो, तसाच तो आमच्या सध्यां शिक्षण क्षेत्रांतूनहि अमान्य व्हायला लागलाय! म्हणजे असं कीं, ज्या विधवा मास्तरणीला पळविण्याच्या कटांत आपण मला गोंवतां अहांत, त्याचा मुख्य सूत्रचालक एक स्त्री आहे!

**पो. इन्स्पेक्टर** : (विद्याधरपंतास) ऐका विद्याधरपन्त! (प्रोफेसरांस) त्या स्त्रीचं नांव काय?

**प्रो. आचार्य** : तिचं नांव मिस् एलिजा मेंथॉल! ही पूर्वाश्रमीची एक महारीण; पण तिनं अमेरिकन मिशन मार्फत शिक्षण घेऊन, नंतर मग

ख्रिश्चन धर्म स्वीकारला. आणि बेळगांव जिल्ह्यांतल्या एका गांवीं तीं म्युनिसिपल मुलींच्या मराठी शाळेंत, हेड् मिस्ट्रेस म्हणून काम पाहूं लागली. तिच्याच हातांखाली ही विधवा मास्तरीण म्हणून, काम करीत असे!

**पो. इन्स्पेक्टर :** मिस् एलिजा मेंथॉलचं वय काय?

**प्रो. आचार्य :** काम चलाऊ आहे! तिचं वय, आहे सुमार पस्तीस! पण तिची सावत्र मुलगी मिस् रुबेन रिंगॉल, ही आहे तरुण पोर. तेव्हां, तिला आपली मुलगीच हातांखालीं नोकरीवर रुजूं करून घ्यायची होती! पण शाळेंत तर जागा रिकामी नव्हतीं! तेव्हां, गुरुराव मास्तरांच्या मुलीला पळवून, त्या जागेवर मिस् रुबेन रिंगॉल हिची तूर्तास पाटोळ्यांनीं वर्णी लावून दिली आहे.

**विद्याधर :** दादासाहेब! चालूं शिक्षण-संस्था म्हणजे एक कोडं वाटतं, नाहीं?

**प्रो. आचार्य :** अहो, नुसतं कोडंच नव्हे, तर तें एक आज न सुटणारं असं विचित्र कोडं होऊन बसलेलंय! शिक्षण संस्थांना आपापल्या इमारती बांधण्या-व्यतिरिक्त, दुसरं कांहीं सध्यां वेडच नाहीं! टेंपररूली शिक्षक ठेऊन त्यांना निम्या पगारांत राबवून घ्यायचं; पण सही मात्र सबंध पगार पोहोंचल्याची घ्यायची! सुट्टीचा पगार मजूराप्रमाणं शिक्षकाचा कापून घ्यायचा,—बहिरे, तोतरे, पढतमूर्ख 'मास्तर' हंगामी ठेवायचे आणि इन्स्पेक्शन् शाळेंची होईपर्यंतच दुसरें चांगले मास्तर मग भाडोत्री आणावयाचें! कारण, कदाचित् शाळेची ग्रँट् नामंजूर व्हायची, ही भीति! तात्पर्य, शिक्षण-संस्था म्हणजे सध्यां एक मालवणी मासोळ्यांचा बाजार आहे बाजार!

**पो. इन्स्पेक्टर :** आणि तुमच्यासारखे प्रोफेसर म्हणजे या बाजारांतले एक दलालच म्हणायचें, होय कीं नाहीं?

**प्रो. आचार्य :** आपण तें कांहींहीं ठरवा! पण शिक्षणाचा एकदां बाजार भर-विल्यावर मग आमच्यासारख्या दलालांनीं त्यांत सहकार्य हें करायलाच पाहिजे! नाहीं पेक्षां, विद्यादेवीचे "बाजारकरू" आम्हांला कोणत्या वेळीं जिवा अन्नानिशीं मारतील, त्याचा कांहीं नेम नाहीं! अहो, शाळेची फी खाणं, विद्यार्थी—विद्यार्थी-नींचा विनयभंग म्हणून ठरविणं नि शेवटीं मास्तरावर अन् नॅचरल् ऑफेन्सचा गुन्हा लादून त्याला सात वर्षं तुरुंगाची यात्रा घडविणं—या अशा गोष्टी करणं,

म्हणजे आज शाळाखात्याच्या वरिष्ट अधिकाऱ्यांच्या हातचा नुसता मळ आहे मळ! तशांत, पुन्हा सरकारनीं आमच्या शिक्षणखात्यांत कम्युनल् अवॉर्ड सुरू करून एकदंर शिक्षणाचाच गांवगाडा करून टाकलाय! सबब, हा विद्येचा महारवाडा माजलाय दादासाहेब!

**पो. इन्स्पेक्टर :** बरं! सटवाजी धोंडिबा पांगारकरांसबंधीं आतां बोला पाहूं ?

**प्रो. आचार्य :** पांगारकर हे गृहस्थ जातीनं चांभार असून अंडर ग्रॅज्यूएट् आहेत. तरुण असून देखणे आहेत आणि पळविलेल्या मुलीचे खाजगी शिक्षकहि आहेत. त्यांचं तिच्यावर प्रेम असून, हें लग्न लवकरच रजिस्टर होणार आहे. कारण, मुलीला मेजर व्हायला अजून एक आठवडा जायला हवा!

**पो. इन्स्पेक्टर :** म्हणून तिला पळविण्याचा सल्ला, तुम्हीं पांगारकरांना दिला वाटतं-?

**प्रो. आचार्य :** होय, दादासाहेब! तसा दोघांना, सल्ला देणं मला जरूर वाटलं! कारण, दोघंहि विष प्यायची भाषा बोलूं लागले!

**पो. इन्स्पेक्टर :** एकूण, तुम्ही शिक्षण संस्थांतून मिश्र-विवाहहि घडवून आणतां तर ?

**प्रो. आचार्य :** अर्थात्! चालूं शिक्षणांतूनच हिंदुस्थानची अठरापगड जात एक करायची आहे! कारण, त्याशिवाय सरकार आपल्याला 'स्वराज्य' थोडेंच देणार आहे ?

**पो. इन्स्पेक्टर :** बरं, हा दागिन्याचा डबा तुमच्याजवळ कसा आला ?

**प्रो. आचार्य :** ( साश्चर्य ) कसा आला म्हणजे? अहो, दादासाहेब! हा दागिन्याचा डबा माझाच आहे! माझ्या मृतपत्नीचे हे दागिने! तें मी नेहमीं जवळच बाळगित असतों!

**पो. इन्स्पेक्टर :** खरं सांगतां अहांत ?

**प्रो. आचार्य :** यस्! सांगितलं यांत अणुमात्रहि कांहीं खोटं नाहीं! आणि बोललों यापेक्षां मला या प्रकरणाची कांहींच माहिती नाहीं. मी संपूर्ण निर्दोषी आहे!

**पो. इन्स्पेक्टर :** अस्सं कां? ( फटका देत. ) लोकांच्या पोरी पळवूनहि पुन्हा तूं आपला निर्दोषी आँ ? ( शिपायांस ) पोलीस, ठोक याला बेड्या!

( शिपाई प्रो. आचार्याला बेड्या घालतात. )

**प्रो. आचार्य :** अरे–अरे–पण माझं बोलणं नीट तरी ऐकून घ्या !

**पो. इन्स्पेक्टर :** आतां सारं कांहीं तिथंच मी पोलीस स्टेशनवर ऐकतों, समजलं ? पाशवी माणसा, आम्हां पोलीसना हें काय माहीत नाहीं कीं, अट्टल गुन्हेगार-बेरडापेक्षांहि तुम्ही शिकले सवरलेले चांगले सुशिक्षित ग्रॅज्यूएट् लोक, इतपत बदमाषगिऱ्या करून, एखाद्या सोनेरी टोळीवर ताण करीत राहतां ? (प्रत्येकी जिन्नसा त्याच्या पुढं धरीत.) हा दागिन्याचा डबा, हीं सारीं पत्रं नि हा भ्रष्ट केलेल्या मुलींच्या फोटोचा ऑल्बम्. हे सारे पुरावे पाहिले म्हणजे तुला आतां सरस्वति-मंदिरांत आचार्य म्हणून ठेवण्यापेक्षां, काळ्यापाण्याचा कैदी बनवूनच पाठविलेला बरा ! ( विद्याधरास ) ठीक आहे ! विद्याधरपन्त, मी या प्रोफेसर मजकूराला सध्यां रात्रभर पोलीस कस्टडींत कोंडून ठेवतों नि याचा कबूलीजबाबहि लिहून घेतों ! उद्यां सकाळीं 'श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमांत' आलेल्या त्या दोन मुलींची नि तुमच्या बहिणीची साक्ष घेऊन, रीतसर मग हा खटला जाहीर करूं !

**प्रो. आचार्य :** ( चिडून ) दादासाहेब, एका सभ्य सुशिक्षित माणसावर, तुम्ही ही पोलिशी दंडुकेशाही गाजविताहांत, हें बरं नव्हे ! मी तुमच्यावर अब्रू नुकसानीची फौजदारी करीन !

**पो. इन्स्पेक्टर :** ( धक्का मारून ) अरे, जारे फौजदारावर फुकट फौजदारी करूं पाहणाऱ्या प्रोफेसरा ! ( शिपायांस ) घेऊन चला या शिक्षण–समंधाला !

[ पो. इन्स्पेक्टर, प्रो. आचार्याला कैद करून जाऊं लागतो. तोंच मि. ज्युईस हा हातांत वर्तमानपत्र घेऊन येतो. ]

**ज्युईस :** अरे ए विद्याडर, ये इव्हिनिंग न्यूज वाच ! ( वर्तमानपत्र देतो )

**विद्याधर :** ( वाचून ) हें पहा दादासाहेब ! या प्रोफेसरांचीं दुष्कृत्यें उघडकीला आल्याबरोबर याला आपल्या शिक्षण संस्थेनं कायमचं काढून टाकलंय !

**प्रो. आचार्य :** पाहूं पाहूं तें वर्तमानपत्र. ( घेऊन व वाचून. ) ऊं ! जोंपर्यंत शाळा-कॉलेजिस्‌मधून माझा चहाता विद्यार्थी-विद्यार्थिनींचा असंख्य अभिमानी वर्ग आहे, तोंपर्यंत माझी शिक्षणसंस्था ही मला केव्हांहि नोकरीवरून काढूं शकत नाहीं ! तिच्यावर बहिष्कार पुकारून, ते सारे पिकेटिंग करतील ! ही

चालूं शिक्षणपद्धति जोंपर्यंत रूढ आहे, तोंपर्यंत माझी गरज शिक्षणसंस्थेलाहि राहिलच ! नाहींपेक्षां, मी माझी स्वतंत्र "लिबर्टी एज्यूकेशन सोसायटी" म्हणून स्वतःची शिक्षण-संस्था काढीन, तरच नांवाचा प्रो. आचार्य !

**ज्युईस :** आटां कालेपान्यावर टुमी आपली शाला काढून राव्हा ! (फौजदारास) वेल, मि. फौजदारसाब, टुमी ये एकटा प्रोफेसरच कालेपान्यावर धाडेल कां संगां हामचा ॲड्मिनिस्ट्रेटर साबबी पाठवेल !

**विद्याधर :** ज्युईस ! या उद्भवलेल्या शिक्षण प्रसारक खटल्यांतून आतां कोण कोणते मास्तर्स, प्रोफेसर्स, ॲड्मिनिस्ट्रेटर्स, म्युनिसिपालिटी-लोकल स्कूल बोर्डांतले आपले परिचारक–लाल-मेंबर्स किती जण काळ्या पाण्याची हवा खाणार आहेत, हें आतां जगाला दिसेलच ! फक्त दादासाहेब प्रश्न आहे, तो या प्रकरणीं निगडित होणाऱ्या तरुण गतधवा मास्तरणींचा नि आमच्या गौरीसारख्या अल्लड साध्या भोळ्या कुमारिकांच्या अब्रूचा !

[ गणूकाका, गुरुराव दीक्षित मास्तर, सरस्वति व कु. विद्यागौरी प्रवेशतात. ]

**गणुकाका :** आणि म्हणून तूं गाढवासारखा हें प्रकरण पोलिसांत देऊन बसलास, होय ? ( फौजदारास ) फौजदारसाहेब, आमच्या मुलीच्या अब्रूकरितां तरी आपण मेहेरबानी करून, या शिक्षण-समंधाला माफी द्या !

**गुरुराव :** होय, साहेब ! आम्हा पांढरपेशांच्या पोरीबाळींच्या अब्रूचा,-शीलाचा प्रश्न आहे हा ! तेव्हां, मी पाया पडतों-( तसं करायला जातो-पण तो उठवितो. ) हात जोडतो; पण या प्रोफेसराला मुक्त करा.

**सरस्वति :** दादासाहेब, मला धर्माची बहिण म्हणा; पण यांना अगोदर सोडा, ! आमच्या बेअब्रूबरोबर, विद्यापीठाचा बदनामी करूं नका !

**विद्यागौरी :** खरंच, दादासाहेब ! विद्यापीठ हे आम्हां तरुण मंडळींना, विद्येचं माहेर घर वाटतं ! कारण, त्यांतून कितीतरी बुद्धिवान नि परोपकारी कार्यकर्ते बाहेर पडून, आज जगाला आदर्श होत आहेत !

**विद्याधर :** निः संशय ! दादासाहेब, आज आपल्याहातीं स्वतंत्र सत्ता नसूनहि आपण गुलामगिरींतल्या गुलामगिरींत इतपत विद्यापीठाचं महत्त्व जर वाढवितोय;

तर उद्यां सरकारनं सारी सत्ता आपल्याला बहाल करून दिल्यास, आमच्या भारतवर्षीय विद्यापीठांचं ज्ञानवैभव, आम्ही हां हां म्हणतां चारी खंडांना दिपवून, शेवटीं तें अजिंक्यच ठेवूं !

**ज्युईस :** टवा डाडासाव ! आपल्या बॉम्बे युनिव्हर्सिटीला ये ब्लॉट लावूं नका. आन ये पोफेसराची केस टुमी डाबूनश्यान टाका ! नायटर, येच्या संगं हामचा ॲड्मिनिस्ट्रेटर साबबी जेलमंडी जायेल आन हामचा चालू मोटार ड्रायव्हरची नोकरी बी जायेल ! हामी टुमच्या पाया पडटे ( तसं करीत ) हामाला बेकार करूनश्यान टेना कालापानी डाखवूं नका.

**पो. इन्स्पेक्टर :** ( शिपायांस ) शिपाई काढ याच्या बेड्या ! ( ते तसं करतात ) विद्याधरपन्त, शिक्षण-संस्थांचं महत्त्व, आम्हां पोलीस अधिकाऱ्यांना आहे, म्हणून तर आम्ही असले गुन्हे जागच्याजागीं दडपून टाकतो ! कारण, विद्यापीठ, आपणा सर्वांची माय-माऊली आहे ! पण या माऊलीच्या भोंवतीं, सध्यां या प्रोफेसरासारखे मात्रागमनी पशूच फार जमलेले आहेत ! आणि त्यांची कृष्ण कृत्ये, हींहि आम्हां पोलीसच्या डायरीमध्यें भरपूर नोंदलेलीं आहेत ! परंतु, युनिव्हर्सिटीच्या इभ्रतीकरितां नि तुमच्यासारख्या चार अब्रूदार कुटुंबांकरितां म्हणून आम्हांला हें सारं असं जागच्याजागींच निकालांत काढावं लागतं ! ( स्वत: सारे कागद वगैरे पुरावे फाडून टाकतो. )

**तर्कतीर्थ :** ( हार घेऊन प्रवेशत. ) अहाहा ! धन्य धन्य फौजदार साहेब !! अहो, असं केल्यानंच आपल्या घराण्याची अब्रू नि चालू शिक्षण-पद्धतींतला दोषैक्य-न्याय, आपणां सर्वांना दुरुस्त करतां येईल ! अर्थात् हें सहकार्य राहो, म्हणूनच हा तर्कतीर्थ चिंतामण शास्त्री आपलं हें अभिनंदन करीत आहे. ( गळ्यांत हार घालतों. )

**पो. इन्स्पेक्टर :** ठीक आहे ! ( प्रोफेसरास. ) आचार्य, केवळ या सद्गुणी कुटुंबामुळंच तुम्ही आज या घरसोडे फौजदाराच्या हातून सुटला अहांत ! पण याद राखा, पुन्हा जर असल्या भानगडींत पडाल, तर बचंजी तुरुंगांत खडी फोडायला बसवीन, समजलं ?

**प्रो. आचार्य :** छे ! छे ! दादासाहेब, आपण सर्वांनींच मला यावेळीं अगदीं उपकारांनीं मारून टाकलंय ! असं वाटतं कीं, झक् मारली नि इतक्या डिग्र्या

घेतल्या! त्यापेक्षां, एखादं चांगलंसं धंदेशिक्षण जर वडिलांनीं प्रथमपासूनच दिलं असतं, तर माझ्यासुद्धां युनिव्हर्सिटीचा हा फजितवाडा तुम्हां सर्वांना दिसला नसता.

**पो. इन्स्पेक्टर :** हरकत नाहीं! माणूस आहे, तेव्हां तो चुकायचाच! पण त्यानंतर तो सुधारला म्हणजेच देवमाणूस होतो! तेव्हां प्रोफेसरसाहेब, आपण शाळा-कॉलिजीसमध्यें रहा; नाहींपेक्षां स्वतंत्र धंदेवाईक शाळा काढा-पण विद्यादेवीच्या पवित्र मंदिरांत अनीति माजवून विद्यार्थ्यांचं शील बिघडवूं नका, एवढीच माझी तुम्हाला विनंति आहे! कारण, राष्ट्राची पिढी, ही तुम्हां लोकांच्या हातीं आहे! आणि ती शिक्षण संस्थांतूनच शहाणी होत होत आपल्या या गुलाम देशाचा उद्धार करणारी आहे! म्हणून म्हणतों कीं, शिक्षणसंस्था या नैतिक राहूंद्या! त्या नीतिमान् राहण्याकरितां तुम्ही विद्वान् मंडळींनीं हातांत छड्या घ्या! 'लकडी शिवाय मकडी वळत नाहीं' ही आपल्या वाडवडिलांची म्हण, शाळाखात्यांतून फिरून सुरू करा.

**ज्युईस :** हां! खराय टे! छडी लागे छम् छम्। विद्या येई घम्‌घम्। छडीवर पडली सांवली। आम्हांस विद्या पावली!

**पो. इन्स्पेक्टर :** बरंय, प्रोफेसरसाहेब! या गुन्ह्यामुळं तुमचा माझा संबंध आला! तेव्हां, ड्यूटी म्हणून मी तुमचा प्रथम उपमर्द केला! परंतु, आतां मात्र एक विद्वान् सरस्वतीचा उपासक या नात्यानें, मी तुमचा हा असा सत्कार करून, ( स्वतःचा हार प्रो. आचार्यांच्या गळ्यांत घालतो. ) दोस्तीकरितां हात पुढं करीत आहे! ( परस्पर हस्तांदोलन करतात. )

**तर्कतीथ :** पोलीसाची आणि प्रोफेसराची दोस्ती, फक्त नाटकांतच!

**विद्याधर :** ( मोठ्यानें ओरडत ) बोल युनिव्हर्सिटीकी जय!

**तर्कतीर्थ :** चालू शिक्षण झिन्दाबाद!

**ज्युईस :** नाय मामा, मुर्दाबाद बोला!

**विद्याधर :** ( वडिलांस ) बरं, काका! या प्रसंगीं मी आतां आपलं कोणतं प्रिय करूं तें बोला?

**गणुकाका :** तूं या गुरुराव मास्तरांच्या शारदेशीं पुनर्विवाह करून, कांहींतरी उद्योग-धंद्याला लाग!

**विद्याधर :** ठीक आहे ! हा विद्याधर शारदेशीं पुनर्विवाह करून, आजन्म साक्षरतेचा प्रसार मी माझ्या शेतकरी बंधूकरितां म्हणून, खेडोंपाडीं राहून करणार ! झालं ?

**गुरुराव :** अहाहा ! आज मला पुत्रोत्सवाचा आनंद झाला. आत्महत्त्या केलेला माझा गजानन, मला परत मिळाला !

**गणुकाका :** तेव्हां आतां आम्हां उभयवृद्धांची देवीसरस्वतीजवळ, (सरस्वतीस) तुझ्याजवळ नव्हे बरं कां ?

**सरस्वति :** ( हंसत ) नाहीं, विद्यादेवीजवळ—

**गणुकाका :** हां—हीच हात जोडून प्रार्थना आहे कीं, "**विद्येपेक्षां तूं आधीं सर्वांना सद्बुद्धि दे !**"

भरतवाक्य

**श्री शारदे ! कंठ-भूषणा साधना ॥**
**मति मम हार ! विविध-ज्ञान, 'विद्यालंकार' घे गे पूजना ॥**
**ज्ञान-सुधा नित जनता पिवो ।**
**बुद्धि सदा बघ निर्मळ राहो ।**
**अज्ञ-जनां सन्मार्ग सुखावो ।**
**राष्ट्र सबल विद्या-मद दावो ।**
**हिंद-भूमि ही स्वतंत्र होवो ।**
**त्रिखंड वानो " सुलक्षणा " ॥ १ ॥**



— समाप्त —